# प्रीतिपथावर

( स्फुट कवितांचा संग्रह )

(सौ.) पद्मा

---

प्रथमावृत्ति

जून १९४७

---

किंमत दोन रुपये

# चार शब्द

मी कविता लिहूं लागल्यापासून तों हें पुस्तक छापून होईपर्यंत ज्या माझ्या अनेक सुहृदांनीं व मित्रमैत्रिणींनीं वेळोवेळीं प्रेमळ सूचना देऊन व कविता प्रकाशित करण्याचा आग्रह धरून उत्तेजन दिलें त्यांचा येथें मी नामनिर्देशपूर्वक उल्लेख केलेला त्यांना रुचणार नाहीं म्हणून त्यांच्या ऋणाचें मी आज कृतज्ञतापूर्वक स्मरण करीत आहें.

त्याचप्रमाणें माझे स्नेही 'युगवाणी'चे संपादक व सुप्रसिद्ध टीकाकार श्री. वा. ना. देशपांडे यांनीं पुस्तकाला प्रस्तावना लिहून जी शुभेच्छा व्यक्त केली आहे त्याचें मोल औपचारिक आभार मानून कमी होईल की काय अशी भीति वाटते. तीच गोष्ट पुस्तकाचीं मुद्रितें तपासण्याचें कंटाळवाणें काम अत्यंत उत्तम तऱ्हेनें करणाऱ्या श्री. वि. म. ऊर्फ भाऊसाहेब लिमये यांची! या उभयतांचे मी मनःपूर्वक पण अनौपचारिक आभार मानीत आहें.

सर्व गोष्टींत स्वतः जातीनें लक्ष घालून पुस्तकाचें काम सुबक केल्याबद्दल नवीन किताबखान्याचे श्री. श्री. वि. दामले, चित्रकार श्री. दलाल व समर्थ भारत छापखान्याचे चालक श्री. सरदेसाई यांचीहि मी फार आभारी आहें.

महाराष्ट्र शारदेच्या मंदिरांत मी हें पहिलेंच पाऊल टाकीत आहें. या वेळीं मला जसा आनंद होत आहे तशीच भीति व संकोचहि वाटत आहे. पण शारदेवरील भक्ति व रसिकांच्या सहृदयतेवरील विश्वास यामुळेंच मी हें धाडस करीत आहें. माझ्या अल्प सेवेचा स्वीकार होवो हीच प्रार्थना.

पुणें
ता. ३०।६।१९४७ } पद्मा

‘ महाराष्ट्र साहित्य-सभा, इंदूर ’

या संस्थेचें

**पंत–वैद्य पारितोषक** मिळालेली

स्वतंत्र सामाजिक कादंबरी

# पुसलेलीं चित्रें

**सौ. सुधा साठे, बी. ए., बी. टी.**

**किंमत साडेचार रुपये**

**नवीन किताबखाना**

गिरगांव, मुंबई ]                    [ पुणें शहर

*

# प्रस्तावना

**काय** कारण असेल तें असो, आधुनिक मराठींत नांव घेण्याजोग्या कवयित्री अत्यल्प झाल्या आहेत, एवढे खरें. स्त्रियांत प्रज्ञा-प्रतिभा मुळांतच कमी असते, अशी येथें कुणी स्त्री-द्वेष्टा कदाचित् मखलाशी करील! जर्मन तत्त्वज्ञ शोपेनहॉर यानें "स्त्रियांचे केंस लांब, पण मेंदु आंखूड असतो!" अशी टवाळी केलीच आहे कीं नाहीं?—पण ही सारी स्त्री-निंदा व्यर्थ आहे: क्युरी, पर्ल बक, सरोजिनी नायडू-प्रभृतींचें महान् कार्य डोळ्यांपुढें येतांच स्त्रियांच्या योग्यतेसंबंधींच्या संशयाचे ढग ताबडतोब वितळून जातील!

बाकी, इतकें बरीक खरें कीं, प्रज्ञा-प्रतिभा असूनहि स्त्रियांना बौद्धिक कार्यास सर्वस्वीं वाहून घेणे प्रायः अवघडच जातें.—निदान हिंदुस्थानांत तरी अशीच परिस्थिति आहे! एक तर, निसर्गानें स्त्रियांवर मातृत्व लादलेलें असल्यामुळें त्यांच्या कार्यशक्तीस मर्यादा पडल्या आहेत. (आतां, कोणत्याहि बौद्धिक कार्यापेक्षां मातृत्वाची मातबरी अधिक आहे, ही गोष्ट निराळी!) दुसरें असें कीं, आपल्याकडे स्त्रियांना व्यापक अनुभव येण्यास वावच राहात नाहीं. अशा अनुभवाखेरीज त्यांच्या लेखनांत सखोलता यावी तरी कशी? बरें, वाङ्मयांतून मोकळेपणानें हृदयाविष्करण करावें म्हटलें, तर मर्यादशीलपणाच्या कल्पनेची सासूबाई लगेच डोळे वटारून पाहूं लागते!—अशा विपरीत परिस्थितींत स्त्री-वर्गाची कुचंबणा झाल्यास त्यांत आश्चर्य तें कोणतें?

या सर्व अडचणींवर मात करून ज्या स्त्रियांनीं वाङ्मयसेवा केली, त्यांची खरोखर तारीफच करावयास हवी. अलीकडे मराठींत कथाक्षेत्रामध्यें स्त्रियांनीं पुरुषांच्या बरोबरीनें कामगिरी बजाविली आहे, हें सर्वश्रुतच आहे. कवयित्रींबाबत आधुनिक मराठी कविता तेवढी भाग्यवान् नाहीं, याला काय उपाय आहे? नाहीं म्हणावयाला, लक्ष्मीबाई टिळक, मनोरमा रानडे—यांच्यासारख्या दिवंगत आणि संजीवनी मराठे, इंदिरा संत—यांच्यासारख्या विद्यमान कवयित्री काव्यप्रांतांत तुरळक झळकतांना आढळतात. विद्यमान श्रेष्ठ कवयित्रींच्या

मालिकेंत ' प्रीतिपथावर ' या काव्यसंग्रहाच्या लेखिका 'पद्मा' यांचाहि समावेश करावयास पाहिजे.

' प्रीतिपथावर ' या संग्रहांतील कवितांत पद्मा यांचें जें व्यक्तिमत्त्व उमटलें आहे, तें वाचकांस प्रतीत होण्याची पार्श्वभूमि तयार व्हावी, म्हणून येथें त्यांची थोडक्यांत माहिती देतों. पद्मा या आपल्या फुटकळ कविता अगर त्यांचा संग्रह स्वतःच्या संपूर्ण नांवानें प्रकाशित करण्यास नाखूष आहेत, यावरून त्यांची प्रसिद्धिपराङ्मुखता निदर्शनास येते. तथापि त्यांच्या प्रसिद्धि-पराङ्मुखतेस ढळ तर न पोंचावा, पण वाचकांस त्यांची जरूरीपुरती माहिती तर व्हावी, असा सुवर्णमध्य साधून त्यांचा त्रोटक परिचय करून देतों.

पद्मा यांचा जन्म एका खानदानी सरदार–घराण्यांत झाला. अर्थात् त्या चांदीचेंच काय, पण सोन्याचें गोकर्ण तोंडांत धरून जन्मल्या आहेत ! त्यांच्या बुद्धिमत्तेची साक्ष त्या जी. ए. होऊन मराठींत पहिल्या आल्या, या गोष्टीवरून पटेल. अशी ही सुलक्षणी पोर एखाद्या राजघराण्यांत पडावी, असें तिच्या आप्तेष्टांस वाटल्यास त्यांत वावगें तें काय होतें ? परंतु पद्मा यांच्या मनाच्या घुमटांत प्रीतिदेवीचे पदध्वनि आधींच उमटावयास लागले होते ! त्यांच्या या निवडीस प्रथम विरोध झाला; पण अखेरीस पद्मा यांचा त्यांनीं मनानें वरलेल्या तरुणाशीं प्रीतिविवाह झाला ! पद्मा यांच्या ' बंडखोर ' वृत्तीची या प्रसंगावरून चुणूक दिसून येईल. ' पाऊलवाट ' ( पा. ७३ ) कवितेंत त्यांनीं

परक्याची पाऊलवाट ही मान्य नसे मज मुळीं !
बनविन वाट मीहि वेगळी !

—असे तडफदार उद्गार काढले आहेत, ते उगीच नव्हत !

पद्मा यांच्या माहेरीं पोथ्यापुराणें व कथा–कीर्तनें नित्य होत असल्यामुळें मराठी कवितेचें त्यांस, जणूं काय, बाळकडूच मिळालें ! याचा परिणाम असा झाला कीं, त्या दहाव्या-अकराव्या वर्षापासूनच काव्यलेखन करूं लागल्या. पुढें एरंडवणें येथें शिकत असतां कै. वा. म. जोशी यांच्यासारख्याचें शिक्षण आणि उत्तमोत्तम ग्रंथांचें वाचन यांमुळें पद्मा यांच्यांतील कवित्वाचा अंकुर

वाढीस लागून त्याचा वृक्ष बनला. तथापि हा वृक्ष फुलीं–फळीं येण्यास पद्मा यांची प्रीतीच कारणीभूत झाली! पद्मा यांच्या आवडत्या कवींत रवींद्रनाथ टागोर हे प्रमुख आहेत. आधुनिक मराठी कवींपैकीं गडकरी, बालकवि, तांबे, यशवंत वगैरेंवर त्यांचा विशेष भर आहे. त्यांच्या कांहीं कवितांवर या कवींची कमीजास्त प्रमाणांत छापहि पडली आहे, असें दृष्टोत्पत्तीस येईल.

पद्मा या सरदार–घराण्यांत जन्मल्या असूनहि त्यांचा कल समाजवादाकडे झुकलेला आहे, हें ‘ रशियन सप्ताहानिमित्त ’ ( पा. ९३ ) यांसारख्या त्यांच्या कित्येक कवितांवरून स्पष्ट होईल. समाजांतील आर्थिक विषमतेचें प्रत्यक्ष अवलोकन, समाजवादी वाङ्मयाचें वाचन व कांहीं समाजवादी कार्यकर्त्यांचा परिचय–यांमुळें त्यांचा असा दृष्टिकोन बनला. तथापि नव्याप्रमाणें जुन्यांतील ग्राह्यांश घेण्यासहि त्या सदैव तयार असतात. एकंदरीनें पद्मा यांच्यांत बंडखोर वृत्ति व खानदानी इतमाम यांचें मधुर मीलन झालेलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

पद्मा यांच्या कविता ‘ स्फूर्ति ’, ‘ प्रतिभा ’, ‘ सह्याद्रि ’–वगैरे नियतकालिकें व विशेषतः ‘ संजीवनी ’ पाक्षिक–यांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांच्या प्रसिद्धिपराङ्मुखतेमुळें त्यांच्या कवितांचा फारसा गाजावाजा झाला नाहीं, इतकेंच काय तें. त्यांनीं कांहीं नाटिकाहि लिहिल्या आहेत.

—येथपर्यंतचा त्रुटित परिचय पद्मा यांच्या कवितांतील त्यांचें व्यक्तिमत्त्व जाणून घेण्याबाबत पुरेसा होईल, असें मला वाटतें.

‘प्रीतिपथावर’ या काव्यसंग्रहांत पद्मा यांच्या ८१ कविता संग्रहीत केलेल्या आहेत. त्यांपैकीं सुमारें अर्ध्यामुर्ध्या कवितांचा तरी संबंध या–ना–त्या रीतीनें ‘ प्रेम ’ या विषयाशीं येतो! या कवितांचें स्वरूप भावगीतांसारखें आहे. परंतु तेवढ्यावरून त्यांत व्यक्त झालेल्या भावना पद्मा यांच्या व्यक्तिगत आहेत, असें समजण्याचें कारण नाहीं. भावगीतांत प्रथम पुरुषी प्रयोग करण्यांत येतो, हें खरें; पण याचा अर्थ असा नाहीं कीं, त्यांत नेहमींच त्या त्या कवि–कवयित्रींचें आत्मचरित्र कथन केलेलें असतें. मानसशास्त्राच्या दृष्टीनें फार तर एवढेंच म्हणतां येईल कीं, भावगीतांत प्रगट झालेल्या विकार-

विचारांशीं कवि–कवयित्रींचा सहानुभाव असतो. भावगीतांतील इतरांच्या भावनाहि कवि–कवयित्री आपल्या मनाच्या मुशींत ओतून मांडतात, म्हणजेच त्यांवर स्वत्वाचा ठसा उमटवितात. तेवढ्यापुरता त्यांच्याशीं त्यांचा सहानुभाव गृहीत धरण्यास प्रत्यवाय नाहीं. परंतु हीं भावगीतें म्हणजे कवि–कवयित्रींचीं आत्मचरित्रेंच होत, असा निष्कर्ष मात्र नेहमींच काढतां येत नाहीं. पद्मा यांची प्रतिभा भावगीतात्मक ( Lyrical ) असल्यामुळें स्वतःच्याच केवळ नव्हत, तर स्वेतर भावना प्रगट करतांनाहि त्यांची पद्यकृति आपोआप भावगीताचाच साज धारण करते, हें लक्ष्यांत घ्यावयास पाहिजे.

पद्मा यांनीं लिहिलेलीं सारींच प्रेमकाव्यें व्यक्तिगत नाहींत, हें जितकें खरें, तितकेंच त्यांचीं कांहीं प्रेमकाव्यें व्यक्तिगत आहेत, हेंहि खरेंच आहे. या दोन प्रकारच्या प्रेमकाव्यांतील फरक उमगणें कठीण असलें, तरी पण तो उमगण्याचें एक गमक सांगतां येते : प्रीतिविवाह झालेली कुलस्त्री व्यक्तिगत प्रेमकाव्यें कशा प्रकारचीं लिहील, याचें रसिकांनीं स्वतःशीं अनुमान करावें आणि त्या धोरणानें पद्मा यांचीं व्यक्तिगत प्रेमकाव्यें निश्चित करावीं. अर्थात् त्यांच्या ज्या प्रेमकाव्यांत प्रेमपूर्तीच्या समाधानाचा हुंकार उमटला आहे, तींच प्रेमकाव्यें व्यक्तिगत होत, असें खरा मर्मज्ञ तरी खासच म्हणणार नाहीं. या रसिक कवयित्रीनें ‘ पहिल्या प्रीती’चा ताजेपणा अजूनहि कायम ठेवला असला पाहिजे, हें मुद्दाम सांगावयास नको. तेव्हां तिच्या कित्येक व्यक्तिगत प्रेमकाव्यांत उत्कंठा अगर आर्तता प्रस्फुट झाली असल्यास त्यांत अनपेक्षित असें काय आहे ?

पद्मा यांच्या व्यक्तिगत आर्ततापर प्रेमकाव्यांत ‘ वर्षर्तूच्या शोभेंत ’ ( पा. ५ ), ‘ अखेरची आशा ’ ( पा. १० ), ‘ मोहिनी ’ ( पा. ३६ ), ‘ उभी मी कधिंची ’ ( पा. ४० ), ‘ सांग येशील ना ’ ( पा. ४१ ) इत्यादि कविता येतात. यांतील पहिल्या दोन कविता त्यांच्या लग्नापूर्वींच्या–म्हणजे १९३२ पूर्वींच्या–आहेत. पद्मा यांच्या व्यक्तिगत समाधानपर प्रेमकाव्यांची संख्या याहून अधिक आहे. त्यांत आरंभींच्या ‘ अर्पणा ’पासून ( पा. १ ) तों ‘ तुझें दर्शन ’पर्यंत ( पा. ९६ ) अनेक कविता येतात. “ माझ्या जीवनांत तूंच अर्थ निर्माण केलास व मला हंसत जगावयाला तूंच शिकविलेंस ”

( 'अर्पण' पा. १ ); अंतरींची तीव्र जळजळ तुझे सुंदर नयनचंद्र पाहून शांत झाली ( ' सांगु काय मी कुणा ' पा. २५ ); तुझी हृदयनाथाची पूजा करीत असतां दुसऱ्या प्रभूचें पूजन करावयाचें काय काम आहे? ( ' ध्यानमग्ना ' पा. २६ ); मी तुझी सहचरी असतां तूं असा खिन्न कां ?–तुझ्याबरोबर मी कुठेंहि यावयास तयार आहें ! ( ' सहचरी तुझी मी ' पा. ५६ ); तुझें–माझें पटत नाहीं, म्हणून लोक म्हणतात; पण तुला–मला जें मिळतें, तें त्यांस मिळत नसल्यानें त्यांना असा मत्सर वाटतो ! ( 'वदतात लोक सारे' पा. ७६ ); " तूं अनेक पैलू असलेला हिरा आहेस व तुझ्या नव्या–नव्या पैलूचें नवें–नवें तेज मला नित्य दिसतें !" ( ' तुझें दर्शन ' पा. ९६ )—अशा प्रकारें परोपरीनें पद्मा यांनीं आपल्या वल्लभास आळविलें आहे ! त्या सर्वच कवितांचा कुठवर उल्लेख करावा ? वाचकांनीं मुळांतूनच त्या शोधून त्यांचा आस्वाद घ्यावा.

स्वतः पद्मा यांस प्रेमसाफल्याचा अनुभव आलेला असला, तथापि समाजांत प्रेमवैफल्याचींच उदाहरणें जास्त आढळतात. हा अनुभव आलेल्या स्त्रियांचीं चित्रें पद्मा यांनीं कांहीं कवितांतून आत्मीयतेनें रेखाटलीं आहेत : एका वंचित तरुणीस प्रियकराच्या लग्नाची पत्रिका आली असतां ती त्यास सुकलेल्या अश्रूचा नजराणा पाठविते, असा ' सुकलेला अश्रु ' ( पा. ४९ ) या कवितेचा विषय आहे. ' माझं गुपित ' ( पा. ५४ ) कवितेची नायिका आपल्या मैत्रिणीपासून हृदयांतील प्रेमभावना दडवूं पाहते. ही नायिका बहुधा विवाहित असावी ! ' मजविना अपूर्ण तव जीवन ' ( पा. ६५ ) या कवितेंत भलत्याशींच विवाहबद्ध झालेली तरुणी आपल्यावांचून आपल्या पूर्वीच्या प्रियकराचें जीवन अपूर्ण राहिलें असलें पाहिजे, अशी हळहळ व्यक्त करते ! ' जीवितहार '– ( पा. ६७ ) मध्यें दोन प्रेमी जीव लग्न होऊं न शकलें, तरी विवेकानें मैत्रीचें नातें जोडतात व ध्येयसिद्धि करतात, असें दाखविलें आहे. ' समांतर प्रवाह ' ( पा. ७५ ) या कवितेची विवाहित नायिका स्वतःच्या भजनीं लागलेल्या व खुद्द तिला अप्रिय नसलेल्या तरुणास दुरून प्रेम करण्याची विनंति करते ! –याप्रमाणें प्रेमवैफल्याचे हृदयस्पर्शी प्रसंग पद्मा यांनीं कित्येक कवितांत गुंफिले आहेत. त्यांवरून त्यांची व्यापक सहानुभूति निदर्शनास येते.

पद्मा यांची प्रेमाबद्दलची कल्पना उच्च प्रकारची आहे. ‘प्रीतिपथावर’ ( पा. १०३ ) कवितेंत त्या म्हणतात—

प्रीतिपथावरी । चालतां चालतां
विश्वाची भव्यता । नेत्रीं भरे,
विश्वाच्या हृदयीं । प्रीतिपथ दिसे
आणि जीव हांसे । आनंदानें,
जीविताचें मज । विश्वरूप दिसे
जेव्हां चालतसें । प्रीतिपथीं

प्रेमवैफल्याच्या काव्यांपैकीं ‘माझें गुपित’, ‘मजविना अपूर्ण तव जीवन’ व ‘समांतर प्रवाह’ या कवितांच्या नायिका विवाहित आहेत; पण त्यांचें प्रेम ‘Platonic Love’च्या जातीचें असून त्यांत पार्थिवतेला बिलकुल थारा नाहीं! ‘जीवितहार’ कवितेंतील दोन प्रेमी जीवांनीं तर आपल्या प्रणय-भावनेचें उन्नयन ( Sublimation ) करून तिचें मैत्रींत रूपांतर केलेलें असतें! पद्मा यांच्या सर्वसाधारण स्वरूपाच्या प्रेमकाव्यांतील प्रीतींत जर इतकी विशुद्धता भासमान होते, तर त्यांच्या व्यक्तिगत प्रेमकाव्यांतील प्रीतीची फार वरची कोटि असली पाहिजे, हें वेगळें कशाला सांगावयास हवें ?

प्रेमाविषयींच्या अशा उदात्त कल्पनेमुळेंच कीं काय, पद्मा यांच्या स्वेतर भावना प्रगट करणाऱ्या चार–दोन कवितांत एक प्रकारच्या ‘प्रेमपर गूढवादा’-( Mysticism of Love )चा भास होतो, असें मला वाटतें. ‘अज्ञात हुरहूर’ ( पा. ३२ ), ‘निर्धार’ ( पा. ३५ ) वगैरे कवितांचा साकल्यानें विचार केला, म्हणजे त्यांतील नायिका कुणी तरी आदर्श प्रियकर मनाशीं कल्पून त्याची मानसपूजा करतात व तो प्रत्यक्ष दर्शन देण्याची वाट पाहतात, असा गूढ–रम्य देखावा मनश्चक्षूपुढें उभा राहतो. या कवितांतील ‘अज्ञात’ शब्द आदर्श प्रियकरास अनुलक्षून वापरलेला दिसतो. रवींद्रनाथांच्या एका कथेंतील नायिका अशीच आदर्श प्रियकराची मानसपूजा करीत असते, हें येथें बहुश्रुत वाचकांस स्मरेल. कदाचित् या चार–दोन कविता परमेश्वरास प्रियकर कल्पूनहि रचिलेल्या असतील! सूफी कवि अथवा देवनाथादि मराठी कवि यांनीं अशा धर्तीची रचना केलीच आहे कीं नाहीं ?

पद्मा यांच्या कवितांत नव्या युगांतील स्त्रीचा जो आदर्श ठेवण्यांत आला आहे, तो वस्तुनिष्ठ, पण विलोभनीय आहे. ही आदर्श स्त्री प्रेमांत पडते खरी; पण प्रेम सफल झाल्यास पतीकडून पराक्रमाची अपेक्षा करते ( ' खुळी हौस ' पा. ५९ ); आणि, प्रेम विफल झाल्यास रडत न बसतां जनता-चरणावर तनु-मन वाहते ( ' प्रीतीची चाहूल ' पा. ५१ )! अन्याय सहन करण्यास "मी ना सत्ययुगीन आर्यमहिला !"—असें ती चक्क सांगते ( ' प्रतिस्पर्धिनी ' पा. ७० )! "प्रेमळ पति मम देव खरोखर"—असें म्हणूनहि "परी नव्हे तो राखणवाला !"—असा ती स्वच्छ इषारा देते ( ' नव्या युगाची युगंधरा ' पा. १०१ )! ही स्त्री मानवतेचा ध्वज उंच उभारते व समतेचीं गाणीं गाते !—अशी ही तेजस्विनी कुणाच्या आदराचा विषय होणार नाहीं ? आमच्या कित्येक लेखक-लेखिकांनीं स्त्रीनें संसार मोडून बोलपटांत शिरण्याचा जो आदर्श निर्माण केला आहे, त्याच्याशीं पद्मा यांचा हा आदर्श अवश्य ताडून पाहण्यासारखा आहे !

पद्मा यांची प्रतिभा केवळ प्रेमाभोंवतींच पिंगा घालत नाहीं. तिनें स्वतंत्रता व समानता यांचींहि गाणीं गाइलीं आहेत. त्यांपैकीं ' रशियन सप्ताहानिमित्त ' ( पा. ९३ ) व ' नव्या युगाची युगंधरा ' (पा. १०१) या कवितांचा आवर्जून निर्देश करावयास हवा. त्यांच्या किरकोळ विषयांवरील कवितांत ' माझें बाळ ' ( पा. ७८ ) हें वत्सलगीत नितांत सुंदर आहे.

केवळ काव्यदृष्टीनें पाहिलें, तर पद्मा यांच्या ' अर्पण ' ( पा. १ ), ' ध्यानमग्ना ' ( पा. २६ ), ' प्रीतिसमाधि ' ( पा. ३८ ), ' जाईच्या मांडवाखालीं ' ( पा. ४७ ), ' माझें गुपित ' ( पा. ५४ ), ' मजविना अपूर्ण तव जीवन ' ( पा. ६५ ), ' माझें बाळ ' ( पा. ७८ ), ' तुला पाहून ' ( पा. ८५ ), 'निराशेस' ( पा.८८ ) व 'नव्या युगाची युगंधरा' (पा.१०१)—या कविता मला विशेष आवडल्या, हें नमूद करणें अवश्य आहे.

पद्मा यांच्या भाषेंत सहजता व कोमलता हे गुण आढळतात. त्यांनीं वापरलेले छंद जुनेच असले, तरी पण त्यांत विविधता आहे. मात्र त्या ' संयोग-ऱ्हस्वास गुरुत्व देतो '—हा नियम क्वचित्‌च पाळतात! कुठें-कुठें यतिभंगहि होतो !

येथवर आपण 'प्रीतिपथावर' या संग्रहांतील कवितांचें विहंगमावलोकन केलें. त्यावरून पद्मा यांच्या काव्यप्रतिभेची आणि त्यांच्या कवितांत उमटलेल्या त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वाचकांस कल्पना येईल. पद्मा यांचीं कित्येक काव्यें कवित्वाच्या दृष्टीनें सरस-रमणीय तर आहेतच; पण त्यांत वैशिष्ट्यहि आहे, हें विशेष होय. स्त्री-प्रेमाचे विविध पैलू विपुलतेनें व सरसतेने दाखविणें, नव्या युगांतील स्त्रीचा वस्तुनिष्ठ व तेजस्वी आदर्श पुढें ठेवणें आणि समाजवादाचा स्पष्टपणें पुरस्कार करणें-हीं पद्मा यांच्या कवितेचीं त्रिविध वैशिष्ट्यें होत. हीं वैशिष्ट्यें इतर कोणत्याहि मराठी कवयित्रीच्या रचनेंत इतक्या घवघवीतपणानें व एकत्रित स्वरूपांत सांपडणार नाहींत, असें मीं म्हटल्यास मजवर कुणासहि गौण लेखल्याचा आरोप येऊं नये. आरंभीं मीं दिग्दर्शित केल्याप्रमाणें स्त्रियांत प्रज्ञा-प्रतिभा असण्यास निसर्गाची कांहींहि हरकत असूं शकत नाहीं! माझ्या त्या विधानास पुष्टि देईल, अशाच योग्यतेचा हा काव्यसंग्रह आहे. पद्मा यांना उज्ज्वल भविष्यकाळ आहे. त्यांनीं शारदेची उपासना अशीच चालू ठेवल्यास त्यांना मराठी काव्यवाङ्मयांत उत्तरोत्तर अधिकाधिक यश प्राप्त होईल, हें भविष्य वर्तविण्यास ज्योतिषीच कशाला हवा?

यवतमाळ (वऱ्हाड)
ता. २१-२-१९४७ } **वामन नारायण देशपांडे**

# अनुक्रमणिका


| | | पान | | | पान |
|---|---|---|---|---|---|
| अर्पण | ... | १ | २४ एक इच्छा | ... | २९ |
| १ सुहृदास ! | ... | २ | २५ आळवणी | ... | ३० |
| २ कमलाचें पान | ... | ३ | २६ वंचिता ... | ... | ३१ |
| ३ एक स्वप्न | ... | ४ | २७ अज्ञात हुरहुर | ... | ३२ |
| ४ वर्षर्तूच्या शोभेंत | ... | ५ | २८ सहसंवेदन | ... | ३३ |
| ५ वन्य सुम | ... | ६ | २९ निर्माल्य | ... | ३४ |
| ६ उतावीळ बालेस | ... | ८ | ३० निर्धार ... | ... | ३५ |
| ७ बेसुर वीणा | ... | ९ | ३१ मोहिनी... | ... | ३६ |
| ८ अखेरची आशा | ... | १० | ३२ प्रभातकालीं | ... | ३७ |
| ९ ये इंदु ! | ... | ११ | ३३ प्रीति-समाधि | ... | ३८ |
| १० स्मृति-गीत | ... | १२ | ३४ उभी मी कधिंची | ... | ४० |
| ११ भाऊबीज | ... | १३ | ३५ सांग येशील ना ? | ... | ४१ |
| १२ नवी फुलबाग | ... | १५ | ३६ सलगीचे बोल | ... | ४२ |
| १३ माझी प्रीति | ... | १६ | ३७ शांतता नको कधींच | ... | ४४ |
| १४ रानकिशोरीस | ... | १७ | ३८ इशारा ... | ... | ४५ |
| १५ कर्तव्यास्तव | ... | १९ | ३९ जाईच्या मांडवाखालीं... | | ४७ |
| १६ सरितेची प्रेम-कथा | ... | २० | ४० सुकलेला अश्रु | ... | ४९ |
| १७ याचना ... | ... | २२ | ४१ ती ... | ... | ५० |
| १८ धीर कशाचा सांग धरूं ? | | २३ | ४२ प्रीतीची चाहूल | ... | ५१ |
| १९ संभ्रम ... | ... | २४ | ४३ जीवन-चित्र | ... | ५२ |
| २० सांगुं काय मी कुणा ? ... | | २५ | ४४ माझं गुपित | ... | ५४ |
| २१ ध्यानमग्ना | ... | २६ | ४५ सहचरी तुझी मी | ... | ५६ |
| २२ समजावणी | ... | २७ | ४६ प्रपातास | ... | ५७ |
| २३ उषा स्वप्न | ... | २८ | ४७ खुळी हौस | ... | ५९ |

| | पान | | पान |
|---|---|---|---|
| ४८ विहगास ... | ६० | ६५ बंधमुक्ता ... | ८२ |
| ४९ एका रात्रीं ... | ६१ | ६६ वर्षादृश्य ... | ८३ |
| ५० लपंडाव... ... | ६३ | ६७ ऊठ समरिं जाया ... | ८४ |
| ५१ काळ जाई दूर ... | ६४ | ६८ तुला पाहून ... | ८५ |
| ५२ मजविना अपूर्ण तव जीवन | ६५ | ६९ चाहूल ... ... | ८६ |
| ५३ जीवित-हार ... | ६७ | ७० नेत्रचुंबन ... | ८७ |
| ५४ कधीं मज वाटे ... | ६९ | ७१ निराशेस ... | ८८ |
| ५५ प्रतिस्पर्धिनी ... | ७० | ७२ स्वतंत्रते ! ... | ९१ |
| ५६ बाळ ! मजसि निरखुं दे | ७२ | ७३ चल ऊठ प्रवासी ! ... | ९२ |
| ५७ पाऊलवाट ... | ७३ | ७४ रशियन सप्ताहानिमित्त | ९३ |
| ५८ बाळ ! ऊठ ... | ७४ | ७५ जग निराळेंच मम तुझ्याहुनि | ९५ |
| ५९ समांतर प्रवाह ... | ७५ | ७६ तुझें दर्शन ... | ९६ |
| ६० वदतात लोक सारे ... | ७६ | ७७ बापाचें स्वप्न ... | ९७ |
| ६१ चाललें तिकडे रणकंदन | ७७ | ७८ स्वागत ... ... | ९८ |
| ६२ माझें बाळ ... | ७८ | ७९ प्रलय ... ... | ९९ |
| ६३ जेधवा ही पावसाळी ये हवा | ७९ | ८० नव्या युगाची युगंधरा | १०१ |
| ६४ अशी व्हावी रे वहिनी... | ८० | ८१ प्रीतिपथावर ... | १०३ |

# प्रीतिपथावर

अर्पण : : धवलचंद्रिका

तूंच मला शिकविलेंस प्रेम कराया
तूंच अर्थ निर्मिलास जीवनांत या
तूंच दाविलास नभीं दिव्य नीलिमा
तूंच दाविलास नभीं शुक्र, चंद्रमा
तूंच पंख लाविलेंस मानसास या ॥ १ ॥

तूंच दाविलीस यक्षभूमि प्रीतिची
तूंच दाविलीस यज्ञभूमि ऋषींची
तूंच जगीं दाविल्यास आम्र-सराया ॥ २ ॥

तूंच लाविलेंस भव्य, दिव्य पहाया
तूंच लाविलेंस क्षुद्र, नीच सहाया
तूंच मला शिकविलेंस हंसत जगाया ॥ ३ ॥

तूंच कवी, तूंच काव्य, तूंच प्रेम रे !
तूंच प्रेय, तूंच श्रेय, तूंच ध्येय रे !
फूल आणिलें तुझ्याच पायिं व्हाया ॥ ४ ॥

## १. सुहृदांस : : 

नका पाजूं मज । स्तुतीची मदिरा
माझिया अंतरा । भ्रष्टवील
नको अतिवृष्टि । प्रेमाच्या सिंचनीं
बीजच वाहूनि । जाईल हो !
ग्रीष्माचा उन्हाळा । साहूं द्यावा मज
पावित्र्याचें तेज । वाढवाया
गळोत थंडीनें । जीर्ण फुलें पानें
नव्या उत्साहानें । उगवाया
फूल वा कलिका । अमोलिक कांहीं
जेव्हां तुम्हां पायीं । अर्पीन मी
प्रेमाचीं वचनें । करूनिया सत्य
सेवा माझी नित्य । स्वीकारावी

## २. कमलाचें पान : : देवद्वार

कमलाचें पान । जलांत जन्मतें ।
जलांत नांदतें । जन्मवरी ॥
सलिल-लहरी । घेतात चुंबन ।
प्रेमें घाली स्नान । पर्जन्यही ॥
जल-सहवासीं । पर्णाचें जीवन ॥
अलिप्तचि पर्ण । राहे परी ॥
शोभवील जला । मोत्यांच्या समान ।
कोरडेंच पान । स्वतां परी ॥
तसेंच सख्यांनो ! । माझें हें जीवन ।
कमलाचें पान । तुम्हांमध्यें ॥
माझ्या जीवनाशीं । व्हाया समरस ।
वृथा कां आयास । करीतसां ? ॥

१९२९

## ३. एक स्वप्न : : पादाकुलक जीवनध्वनिमिश्र

खवळला सागर बघ हा किती !
नाथ-ध्यान एकांतिं कराया
निघे बालिका मन रिझवाया
नौकेंतुनि चालली, देख परि हतदैवाची गति ॥ १ ॥

रूप भयानक दाहि दिशांचें
वीज कडकडे, वायू नाचे
बाळ एकली बघे बावरुनि, प्रलय जणूं भोंवतीं ॥ २ ॥

धडक अखेरी घे खडकाशीं
शकलें नौकेचीं,—भाग्याचीं
लाटांवरती देह भडकला, जात खालखालती ॥ ३ ॥

अरण्यरुदनचि होती हांका
मूर्च्छित झाली क्षणीं बालिका
कुणीं जलचरें वाहुनि नेली, पाताळामधिं सती ॥ ४ ॥

कोमल बाला वेडि जाहली
दिव्य प्रीतीनें केवळ नटली
पाताळांतिल मौक्तिक जमवुनि माळा केल्या किती ॥ ५ ॥

गुंफुनि ऐशा मौक्तिक-माला
विनवित वेडी जलदेवीला
कुणि तरि द्या हो प्रियकर-करिं ही मत्प्रेमाची स्मृति ॥६॥

मौक्तिक-माला माझी देखुन
मौक्तिक गळतिल तन्नेत्रांतुन
द्या ते मजला आणुन, देतिल जीवन जीवाप्रति ॥ ७ ॥

१९२९

## ४. वर्षर्तूच्या शोभेंत : : तुलसी

वर्षा वर्षतो ग दारीं
नाहूं घाली अवनीला
सुधादृष्टी जणूं मला
सख्या! तूझी ॥ १ ॥

डोलडोलती या वेली
मंद सजल पवनें
जेवीं तुझ्या निःश्वासानें
राजसा! मी ॥ २ ॥

हांसहांसती हीं फुलें
दंवबिंदूच्या मोत्यांनीं
आणि तुझ्या प्रेमाश्रूंनीं
मन माझें ॥ ३ ॥

देख देख इंद्रचाप
शोभे मेघांच्या कंठांत
गडे, माझे मृदू हात
तुझ्या गळां ॥ ४ ॥

तरूतरूंच्या कोटरीं
पाखरें हीं विसावलीं
जेवीं तुझ्या वक्षःस्थलीं
उदारा! मी ॥ ५ ॥

नाचनाचते बिजली
प्रभा फांके काळोखांत
धीर देई विरहांत
स्मृति तुझी ॥ ६ ॥

१९३१

## ५. वन्य-सुम : : द्रुतविलंबित

पवन वाजवितो मधु बांसरी
डुलतसे वनसुंदरि लाजरी
विमल निर्झर नृत्य जिथें करी
उमललें सुम त्या गिरिकंदरीं

क्षणिक जीवनिं ओति सुरम्यता
दरवळे वन तें सुम हांसतां
हंसत हांसविणें प्रभु-हेतु हा
न धरि पुष्प दुजी हृदयीं स्पृहा

रमणि रम्य कुणी वनिं पातली
सुमन देखुनिया मृदु हांसली
अधिर जों खुडण्या कर धावले
रमणितें निरखी सुम बोललें

" भगिनि, थांब गडे मज सांग ना
खुडिसि कां प्रभुतें मज वाहण्या
स्वपतिला स्मृति-चिन्ह समर्पिण्या
खुडिसि कां स्वशिरीं मज गुंफण्या !

मनुज-संग नको मृतिही बरी
जहर स्वार्थ मनीं मुखिं माधुरी

करिं अशा वसती, सखि ! त्याहुनि
सुकुनि पुष्प गळो वनिंचें वनीं !

खुडुनि सौख्य मिळे जरी, देवते
सुखिच हो, परि एकच प्रार्थितें
हृदयिं नित्य धरीं मजला, सखे !
न तव संगतिला करिं पारखें."

स्तिमित ती वच ऐकुनि जाहली
रमणि प्रीति-सुधा जणुं भासली
खुडियलें न फुला परि चुंबिलें
नकळतां क्षण अश्रुहि सिंचिलें

१९३१

## ६. उतावीळ बालेस : : हरिभगिनी

विश्रांतीची वेळ जाहली नीज नीज, बाले! आता
कुसुम-शयन कां खुपतें तुजला? अश्रु येति कां नभि बघतां
इंदुसभोंतीं निज तेजाचा गगनी तारा फेर धरी
नेत्र सांग ना कुठें रोखले? करिति पहारा कुणावरी?
रजनी देवी हार गुंफिते स्वर्गंगेचा पाहुनिया
कोमल कर कां स्फुरण पावती? भाग्य कुणाचें ये उदया?
हळूच स्पर्शे पवन लतेला मृदु पर्णें सळसळतात
"इश्य! काय हें?" वदुनि कुणाला लाजतेस एकांतांत?
सरोवरीं शशिवदन बिंबलें, बघुनि चित्त कां बावरतें?
कशास वेडे दर्पणिं बघसि? तुझ्याविना कोणि न येथें
नकळत झांकी वसुंधरेचे नेत्र इंदुराया बघुनी
जागृतिं-स्वप्नीं रंगुनि, बाले! स्वनेत्र झांकिसि स्वकरांनीं.
शीळ नव्हे रसिकाची-गाणें रातकिड्यांचें चालतसे
नच पदरव हा, सखे! कुणाचा निर्झर झुळझुळ वाहतसे
उतावीळ तूं! धांवुं नको ग, दार बंद कोणि न आलें
अडखळुनी पडलीस हाय! तुज कुणिं इतुकें वेडें केलें?
ध्यान भंगलें! अनुरक्तेच्या पूर वाहती नयनींचे
नव सरितेच्या प्रीति-जलाचे खेळ संगमापूर्वींचे
ऊठ, पुरे; लाडके! हास ना खेळ स्वप्न-सृष्टीमधले
भाग्यवती तूं! बघशिल त्यांना सत्य जीवनीं अवतरले

१९३१

## ७. बेसुर वीणा : : लवंगलता

बेसुर झाली वीणा आतां कसलें मंजुळ गान
सूर लागले कटुतर, सखये, घेतां जीवित-तान
हृद्-वीणा घेउनी भटकलें रानोमाळ अनाथ
भयाण भेसुर जग दिसलें ग, कुणीं न दिधली साथ
वेडच लागे-भान हरपलें-गाच एकदां गान
एकदांच वीणेस साथ द्या जीव चरणिं वाहीन
एकच आशा धरुनि तपस्या गिरिशिखरावरि केली
मूर्ति कुणाची नयनमनोहर कुठुनी जवळी आली ?
कुणी घेतली मजपासुनिया हृद्वीणा स्वकरांत ?
नेत्र वेधले वदनावरि त्या वृत्ति बावरी होत
कुणीं छेडिल्या वीणातारा फिरवुनि कर हलुवार
नाद लहरिवरि जीव तरंगे-विश्व भासलें मधुर
बीनवादिनी आजवरींची प्रेमगायिका बनलें
साथ जिवाची त्यास दिली ग कशी कुणाला न कळे
दिव्य नाद, मधु गीत ऐकुनी जगहि डोललें सगळें
स्वर्ग तुच्छ ! हा- ! क्षणांत लोपे ! भासच कां ते ठरले !
गुंगवुनीया दीन जिवाला वादक कोठें जाई ?
जादुगार तो स्वमन शांतवी, वीणा फेंकुनि देई
बघूं भिरिभिरी कुठें त्यास कां असाच कंठूं काळ !
वीणा फुटली-गानहि विरलें-फिरतें रानोमाळ

१९३१

## ८. अखेरची आशा : : देवद्वार

कशास सोडिशी । सांग पुष्प बाण
मन्मन पाषाण । जीवलगा ॥ १ ॥
काय ही शोधिते । प्रेमळ नजर
नाचरा निर्झर । वाळवंटीं ॥ २ ॥
खडकांत कैसें । बीज हें रुजेल !
व्यर्थ ना जाईल । वर्षाव हा ॥ ३ ॥
गडे, नको धरूं । नेत्र झांकुनियां
काळवंडे काया । स्पर्शे माझ्या ॥ ४ ॥
निराश मनाचे । निःश्वास विषारी
होई, सख्या ! दुरी । कोमलांगा ॥ ५ ॥
भिकारीण रत्ना । आणील कोठून !
स्वर्गाचें कोंदण । तूजलागीं ॥ ६ ॥
नको उघडूं ना । झांकलेलें द्वार
राजसा ! आवर । मोहनी ही ॥ ७ ॥
भाग्यवती कोणी । घेऊनिया माळ
तिष्ठत असेल । मंदिरांत ॥ ८ ॥
स्वीकाराया माळ । जाई रे, मोहना !
विसरूनी दीना । चिरकाल ॥ ९ ॥
अखेरची आशा । हेंच देई देणें
विस्मृतीचें लेणें । मजलागीं ॥ १० ॥

१९३१

## १. ये इंदु ! : : पुष्पिता

ये, इंदु ! येइं आकाशीं
मज दावीं सुगम वाट
प्रिय-दर्शन घ्याया जातां
प्रिय-चिंतनिं तल्लिन होतां
कळलें न भानु जावोनी । ये केव्हां घोर रात !। १ ।।

काळोख भयानक माजे
जलदही हंसे उपहासें
हा हृदय कांपवित माझें । काननिचा चंडवात ।। २ ।।

पद टाकावें जों पुढती
प्राणांतिक कांटे रुतती
फूत्कार विषारी येती । जरि मार्गे वळुनि जात ।। ३ ।।

गर्जना रानराजाची
छे ! नव्हे—हांक काळाची
ये, सख्या ! धांव, शशिराया !। संकटिं या देइं हात।।४।।

मरण प्रेम-मार्गी येई
मानितें भाग्य हें बाई
करि क्षमा, हृदय-राजीवा ! । पाहिन मी स्वर्गी वाट ।।५।।

१९३१

## १०. स्मृति-गीत : लवंगलता

तारुण्याचा वसंत उमले कोकिल गाई मधुर
हृदयाच्या तबकडिंत गुंफिले उन्मादक ते सूर
आम्रतरू बघ वठुनी गेला कोकिल जातां उडुनी
गिरक्या घेते हृदय-तबकडी तेंच गान गावोनी
आत्मा होउनिं स्वरसंवाहक काढि तेच ते सूर
पंजरांत परि बद्ध विव्हला ऐकण्यास ना धीर
ध्येयाचें गिरिशिखर मोडलें, प्रणयाचा हो चूर
आयुष्याचा नूर पालटे कां मग ही हुरहूर !
पूर्ववैभवा गाउनि मारी बाण विधी अनिवार
सांग, ताइ ग, असाच कां हा जन्मवरी खुपणार !
सैतानाचा नाच चालितें हृदयीं तें स्मृति-गान
जळुनि चालल्या मृदुल भावना, हाय ! हरपलें भान !
ताइ ताइ ग, झांक कर्ण मम प्रेमल तव हस्तांनी
एक क्षणाची शांति सेवुं दे हृदयी शिर टेकोनी
गत कालाला विसरुनि करण्या भावि आयु सुखदायीं
फोडुनि थांबवि हृदय-तबकडी, गीत तसें भयदायी
खोल दरीमधि दे फेंकुनि हा " ग्रामोफोन " मनाचा
सावर, ताई, तोल सुटे ग ऽ बुडल्या दीन जिवाचा.

१९३१

## ११. भाऊबीज : : भुवनसुंदर, माध्रवकरणी मिश्र

कशाची भाउबीज आज । दश दिशा धुंद पहा झाल्या
शृंखलाबद्ध राष्ट्रमाता । तीर्थ मग होय बंदिशाला
त्यागुनि तिजला सुपुत्र पळती
लाज न हृदयाची
कशाची भाउबीज माझी ? ॥ १ ॥

प्रेम ना ओवाळिल माझें । कुणाही भ्याड पळपुट्याला
घेइल ओवाळणि कैसी । लागला दास्य-डाग ज्याला
परवशतेचीं गीतें गाया ।
मन नाही राजी
नव्हे ही भाउबीज माझी ॥ २ ॥

बंधु, ही भव्य बंदिशाला । आपणां देइल स्वातंत्र्य
खेळवुनि ऐक्य-पवन येथें । घुमविल राष्ट्र-प्रेम-मंत्र
पुण्य-भुवनिं त्या प्रवेश कर जा
होइल कीर्ति तुझी
तीच रे भाउबीज माझी ॥ ३ ॥

ऐकुनी मातेचा टाहो । फुटोनी पाझर हृदयाला
स्वरक्तें कुंकुम-तिलक तिला । लावण्या सिद्ध बंधु झाला
स्वातंत्र्याच्या पुष्पांनीं कर
पूजा आईची
तीच रे भाउबीज माझी ॥ ४ ॥

घेउनी स्वशिर-कमल हातीं । कराया राष्ट्र-देवि-पूजा
रणांगणि धाव घेइ वेगें । जेधवां बंधुराय माझा
जयघोषाची लाट उसळतां
जनता-हृदयाची
तीच रे भाउबीज माझी ॥ ५ ॥

शत्रुच्या रुधिरें न्हालेला । राखितां स्वकुलाचें नांव
कराया मुक्त राष्ट्र-माता । झेलि जो हृदयावरि घाव
त्याच बंधुला करिन आरती ।
पंचप्राणांची
अहा ! ती भाउबीज माझी ! ॥ ६ ॥

१९३१

## १२. नवी फुलबाग : : केशवकरणी

मृत आशांचें रान निकस तें हृदयी मीं जाळिलें
त्यांत नव बीज आज पेरिलें

नैराश्याचे दीर्घ उसासे लोपुनिया चहुंकडे
वाहतो मंद पवन हा गडे

नव फुलणाऱ्या फुलबागेला उगवाया नवतिनें
करूं दे अश्रूंचीं सिंचनें

नव फुलणाऱ्या जीवन-जुइला मंडप घालूं कसा ?
लावुं का अशोक आधारसा ?

प्रीति-गुलाबा कलम करूं का स्नेहाचें नीलसें ?
मोगरा खुलवुं कुठें राजसे ?

ममतेच्या या बकुल तरूला शेजारीं लावुं का ?
केतकी-कुंज इथें उभवुं का ?

सांग सांग ना नव बागेची रचना करुं मी कशी ?
कां अशी दीनमुखें पाहसी ?

देउं तिलांजलि गत कालाला; वर्तमान पातला
ऊठ म्हणुं " सुस्वागत " त्याजला.

१९३२

## १३. माझी प्रीति : : देवीवर

नको सख्या ! जाऊं तेथें
मृगजलाचा आभास
माझी प्रीती शांतवील
तुझ्या हृदयींची आस ॥ १ ॥

नको वाहूं पुष्पहार
सुगंधांत साप डुले
कर-पल्लवाची माला
तुझ्या वक्षावरी रुळे ॥ २ ॥

नको क्षणिक सारंगी
तुज क्षणच मोहील
हृदयाची वीणा माझी
छेड तारा चिरकाल ॥ ३ ॥

चंचल त्या जलामाजी
नको बिंब पाहूं राया !
तुझ्या सत्य स्वरूपाची
माझ्या नेत्रीं पडे छाया ॥ ४ ॥

कलंकित इंदुकला
नको पाहूं गगनांत
माझ्या भाळी शोभे कोर
तुझ्या चांदणें मनांत ॥ ५ ॥

नको सोडुनिया जाऊं
भानु तूं, मी प्रभा तुझी
एकमेकां धीर द्याया
स्मृति ठेवूं या प्रीतीची ॥ ६ ॥

१९३२

## १४. रानकिशोरीस : : नवबधू

उद्यान रम्य जरं चोंहिकडे
सखि, भीति कशाची सांग गडे ?
गान-सुधेची उधळ माधुरी
स्कंधिं बैसतिल शुक जे तरुवरि
व्याध शरहि थांबवील स्वकरीं
मग शांत जगी आनंद चढे ॥ १ ॥

प्रमुदित नलिनी डोले सलिली
शुभ्र कौमुदी नभीं विकसली
उद्यानीं मनिं पखरण घाली
भयकंपित कां मग हृदय उडे ?--॥ २ ॥

अखंड वाहे प्रीति निर्झरी
सौख्याशेच्या नाचवि लहरी
तादात्म्याच्या घेत लकेरी
बेभानपणें जल स्वर्गि उडे-॥ ३ ॥

नयनाकाशीं काय बिंबलें ?
अश्रु ? छे ! गडे, मेघ दाटले
क्षणिं जलधारा झडतिल बाले
शोकाचे मग विरतील कडे—॥ ४ ॥

सोड भीति, सखि ! कंटक जळले
जहर विषारी सर्प पळाले
कुसुम-गंध मधुमधुनि दरवळे
मांगल्य घालि तव मार्गी सडे—॥ ५ ॥

भाव-सुमांची माला गुंफुनि
एकरूपता आसन मांडुनि
पूजिशील जरि हृदयोद्यानीं
पाषाणहि होइल देव गडे ॥ ६ ॥

दे मत्करिं कर ऐक विनवणी
या मम हृदयी स्वशिर टेकुनी
देख, अशी वर नयन रोखुनी
जी शीव सुखाची स्वर्गी भिडे ॥ ७ ॥

( सौ. संजीवनी मराठे यांच्या "रानकिशोरीस" वनाची दाखवलेली दुसरी बाजू )

१९३२

## १५. कर्तव्यास्तव : : शार्दूलविक्रीडित ( सुनीत )

ऐके दुंदुभि वाजताति, सखये, दे हांक मातें कुणी
टाहो फोडुनि कोण दीन अबला टाकी मना पोळुनी
सोडीं मत्कर, ऐक, कां उमटती हे शब्द स्वर्गातुनी !
"माता संकटिं धाय मोकलि तुझी–सोडीव तीलागुनी"
राहूं दे अपुरीच माळ–मजला ना साहती यातना
कर्तव्यीं यम-पाश कंठिं पडणें तें सौख्य मालेंत-ना
माझ्या मानसिं तूंच ना ठसविलें हें सत्य, तेजस्विनी !
"कर्तव्यास्तव सौख्य, प्रेम, सखया, त्यागूनि जाई रणीं !"
वाग्देवी तव हीच युद्धिं मजला उत्साह गे देइल
दे आशीर्वच, देवि ! वीर समरीं सत्कीर्तिमान् होइल
अश्रु आवर हे–प्रसाद म्हणुनी दे खड्ग, हे देवते !
त्यानें छेदुनि शत्रुकंठ भगवा रोवीन झेंडा इथें
मातेचें ऋण फेडुनी सुविजयीं भेटेन मी सत्वरीं
धारातीर्थि मरून स्वर्गि तुजला पूजीन गे ना तरी.

१९३३

## १६. सरितेची प्रेम-कथा : : पुच्छ गुच्छ

शैलराज-हृदयांत
कोठें वाहते सरिता
कशाला हो ठाव घेतां
रसिकांनो ! ॥ १ ॥

गेली माहेरा त्यागूनी
केलें कुणा भाग्यवान
नका विचारूं हे प्रश्न
सुहृदांनो ॥ २ ॥

नाही सांगत तुम्हांला
तेजोनिधि आकाशींचा
तोच हृदयेश तिचा
रविराज ॥ ३ ॥

नका ऐकूं—कर्तव्यार्थ
त्यागूनीया सौख्य-राशी
योग-शांतीनें सिंधूसी
कोण वरी ॥ ४ ॥

नव्हे अश्रु निराशेचे
उधळले फेन-मोती
हांसविली सृष्टि-सती
दोही तीरीं ॥ ५ ॥

नाहीं नाहीं ती वदली
“ रवि माझा हृदयेश
जरि तनू कर्तव्यास
अर्पियेली ! ” ॥ ६ ॥

होतां पित्राज्ञा पालन
सुके सरिता शेवटीं
रेखियेला नभःपटीं
प्रेम-जय ॥ ७ ॥

मेघरूपें सरितेनें
नभीं रवीला चुंबिलें
छे ! मी वेडीच बोललें !
विसरा तें ॥ ८ ॥

१९३३

## १७. याचना : : देवीवर

नको अशी हाक मारूं
मध्यें संकटांची दरी
प्रभु उभा पैल तीरीं.

नको गळां मिठी घालूं
कर्तव्याची दृढ आस
मुक्त करो हृदयास.

भावमौक्तिकांचे सर
उधळिसी प्रेतावरी
येणें काय शोभा परी ?

तुज जीवाची या आण
प्रेम जरी माझ्यावर
सोड धिक्काराचे शर.

शर जावोत भेदून
माझी नीच दुर्बलता
तापवोत माझ्या चित्ता.

आणि मग ध्येय-गिरी
जातां अखेर चढून
तेथें तुलाच पूजीन.

१९२३

## १८. धीर कशाचा सांग धरूं ? : : हरिभगिनी

यौवन-उद्यानांत नाचलें कारंजें सौख्याशेचें
अमृत म्हणुनी मद्य प्राशिलें बंध तोडुनी स्नेहाचे
मद्य संपलें, धुंदि उतरली, शून्य, शून्य मग चोहिंकडे
जीव निमाला, चिताहि विझली, राख राख पसरली पुढें
बोथट झाले कांटे, गेला गुलाब मातिमधीं गळुनी
उडुनी गेला गंध वायुवरि, पाचोळा करिं देवोनी
विमल जलाचा निर्झर सुकला, मृगजल तिमिरें झांकियलें
सिकता-कण नच पोळति चरणा, खळग्यामाजीं पद पडलें
जीवन-हेतू विखरुनि जाई; प्रेमाशेसह उच्छ्वसनीं
हाय ! शोधुं मी स्मृतिला कोठें शून्याच्या वैराण वनीं ?
नैराश्याच्या पलीकडे हा जीव ओढतो काय करूं ?
जिवाशिवाचे धागे तुटतां धीर कशाचा सांग धरूं ?

१९३३

# १९. संभ्रम : : देवद्वार

पाहूं कुठें तुला । विचारितां ऐसें
फुलामध्यें हासे । तेजोनिधी ॥ १ ॥

ऐकूं कुठें तुझे । बोल ते अमोल
दाविल कोकील । आम्रावरी ॥ २ ॥

शिकविलें मज । पाहावया रूप
निसर्ग अमूप । दावुनीयां ॥ ३ ॥

कोणीकडे परी । अंतरींची ओढ
आकळेना गूढ । काय करूं ॥ ४ ॥

नेत्र कर्ण माझे । कोणीं झांकियेले
मन वेडावलें । शोधूं जातां ॥ ५ ॥

मोहाची अंगाई । गाउनिया मज
कोण आणी नीज । अवेळीं या

१९३४

## २०. सांगुं काय मी कुणा ? : : प्रफुल्ल

नितान्त शांत चांदरात पसरली जगावरी
उमलली धरा खरी
रातराणिचा सुगंध दरवळे चराचरी
ओढ लावि अंतरीं
वाटतें प्रफुल्ल काय अंतरांत जाहलें
देहभान हरपलें
अंतरांत भावसिंधु करित नृत्य कोमल
हृदय होत व्याकुल
गुंफितात हात बकुल-मालिका झराझर
हृदय होत थरथर
हृदयिं खळबळे परंतु नयनिं नीर येइना
हृदय शांत होइना
शोक वा प्रमोद काय जाहलें कळेच ना
सांगुं काय मी कुणा
तोंच वाजलीं हळूंच पाउलें पथावरी
ऊर्मि नाचल्या उरीं
सावरूनि अंचलास हृदय दाबुनी करीं
पाहिले हळू वरी
तोंच दोन रम्य नयनचंद्र वर्षती सुधा
हृदय शांत हो तदा

१९३४

## २१. ध्यानमग्ना : : वरमंगला

हासऱ्या भावना दाबुनी अंतरी
रुक्ष जगतीं कसा जीव जगवूं तरी ?

नाचऱ्या निर्झरा घालुनी बंधनें
सांग फुलवूं कशीं हृदयिंचीं उपवनें ?

वदन-कमलावरी गुंगल्या लोचनां
दाखवूं कोणतें दृश्य मधु त्याविना ?

हृदय-रत्नास या अंतरीं लपवुनी
सांग सजवूं तनू कोणत्या भूषणीं ?

वचन-श्रवणास त्या अधिर झाल्या मना
गीत तरि कोणतें ऐकवूं त्याविना ?

भव्य भालीं दिसे भाग्यरेषा जरी
शोधुं तरि कोणतें अन्य सुख भूतलीं ?

हृदयनाथा, तुला निशिदिनीं पूजितां
पूजुं तरि जगतिं या अन्य प्रभु कोणता ?

१९३४

## २२. समजावणी : : नववधू

मधुकरा, सोड ना हा रुसवा
धरिं अधरिं गोड गुंजन-पावा
शुभ्र दंवाचा बुरखा सारुनि
निसर्ग हंसतो पुष्प-दलांतुनि
गाति विहंगम तरु-कुंजांतुनि
त्या साथ गुंजनें द्यावि तुवां—॥ १ ॥

रम्य विलासीं विश्व रंगलें
रसिका, मन कां खिन्न जाहलें ?
ते बघ लाजुनि कोण हांसलें ?
एकदां नयन तिकडे फिरवा—॥ २ ॥

हरित गर्द वनराजीमधुनी
बनवि सरोवर निसर्ग रमणी
बघ तेथें तव जीवन-राणी
जा, तोच सुखाचा तुज ठेवा—॥ ३ ॥

पर्णांच्या मृदु वस्त्राभरणीं
मुदें डुले अभिमानी नलिनी
रंजविते तिज विभवें अवनी
परि वेध तुझा लागे जीवा—॥ ४ ॥

हृद्गत लपविल मानी कमला
राग धरु नको म्हणुनी भ्रमरा !
स्त्री-हृदयाचा ठाव ना तुला
तव स्पर्श फुलवि हृद्-राजीवा ॥ ५ ॥

१९३४

## २३. उषा-स्वप्न : : शुभवदना

रजनि धवल गुंफितसे हार कौमुदीचा
हंसत मदन करित खेळ बहर यौवनाचा
रम्य रत्न-मंचकांत
देवि उषा निद्रांकित
धुंद करित मानसास, गंध मधु सुमांचा ॥ १ ॥

देवि ! हांसतेस गालिं
चाहुल कां तुज आली ?
वदनेन्दू बघसि काय स्वप्निं प्रियतमाचा ? ॥ २ ॥

सांग गडे, कोण तरुण
अंगुलींत प्रेम-चिन्ह
घालुनिया चढवि कळस प्रेम-मंदिराचा ? ॥ ३ ॥

बाहुपाश गुंफाया
उचलुं नको कर वाया
जागृतींत या विरेल खेळ हा मजेचा ॥ ४ ॥

दचकलीस काय गडे ?
बघसि काय चोहिंकडें ?
नीज पुनः पाहशील भास तो सुखाचा ॥ ५ ॥

१९३४

## २४. एक इच्छा : : लवंगलता

(Samuel Rogersच्या "A Wish" या कवितेचें रूपांतर )

तृणमय शय्या पर्णकुटीमधिं नील टेकडीखाली
रानपांखरें सदैव गाती मधुर गीत भंवताली
वळसे वळसे घेउनि निर्झर लपंडाव प्रेमाचा
खेळत खेळत नाच करी मजभंवती आनंदाचा
हरित लतांचें मृदुल आवरण माझ्या छपरावर तें
हळूच तेथें घरट्यामधुनी चिमणी ही चिवचिवते.
निर्भय-चित्तें दार उघडुनी भक्त कुणी देवाचा
येइ पाहुणा; लाभो मज तो सहवासहि भाग्याचा,
अंगणिं माझ्या सदैव हंसतो आनंदें ऋतुराज
सुंदर सुमनें सदाच सजलीं चढवुनि मौक्तिक-साज
ब्रिजलालाच्या रम्य मंदिरीं वटवृक्षाच्या खाली
प्रेमबद्ध होउनियां आम्हीं विवाह-वचनें दिधलीं
चित्तकोकिला लीला माझी नीलवसन लेवोनी
सारंगीवर आळविते ती मंजुळ प्रेम-कहाणी
सायंतनिं हा पवन ओतितो ध्वनि आरतिचा श्रवणीं
सुख-शांतीचा मार्ग दाविते मंदज्योत ही सदनीं

१९३४

## २५. आळवणी : :

दया-धर्मी तुज । पाहायाच्या नेमा
धरोनी जीवना । रमविलें ॥ १ ॥

निर्झराच्या गानीं । वल्लरींच्या पानीं
मूर्ति प्रेम-खनीं । देखियेली ॥ २ ॥

रवि-करामाजीं । तुझा दिव्य स्पर्श
समजोनी हर्ष । मानीयेला ॥ ३ ॥

पर्जन्य-वृष्टींत । कृपेचा ओलावा
जाणवोनी जीवा । जगविलें ॥ ४ ॥

जनीं जनार्दना ! । पूजियेलें तुला
हृदय-व्यथेला । लपवोनी ॥ ५ ॥

परी किती दीस । साहूं रे हा ताप
धाव, मायबाप ! । धाव आतां ॥ ६ ॥

नाहीं नाहीं आतां । सोसवत ताण
देवोनी दर्शन । निववावें ॥ ७ ॥

१९३४

## २६. वंचिता : : शार्दूलविक्रीडित

पूर्वेच्या नव मंडपीं मधुरशी शोभा गुलाबी खुले
देती स्वागत डोल डोलुनि कुणा वेलीवरी हीं फुलें
मोदें हांसत रंजवीत जगता येई उषा सुंदरी
पाहोनी अरुणा पथींच थबके मूर्ती तिची लाजरी
होई तोंच चहूंकडूनि कसला वाद्यध्वनी मंजुळ
गाऊं लागति कीर्तिगान रविचें चंडोलही उज्ज्वल.
सम्राट् भास्करराज येइ गगनीं आनंदलीं भू-सती
गेली बावरुनी उषा बघुनि त्या ओवाळिना आरती
पाहे भेदक लोचनीं सखिकडे भासे रवी दाहक
देई लाथ शिरीं विनम्र अरुणा कोमेजलें यन्मुख.
कोपें बोलुनि कांहिंसें जहरि दे लाथाडुनि आरती
जाई हासत पश्चिमा-सदनिं अन् तांबूल घाली मुखीं.
येतां घेउनि आरती प्रतिदिनीं देवी नभःप्रांगणीं
जाई तो सविता कठोर हृदयें प्रीतीस धिक्कारुनी.

१९३४

## २७. अज्ञात हुरहुर : : शुभवदना

विफल कशा आकांक्षा जाहल्या कळेना !
शांति मधुर हृदया कां अजुनिही मिळेना !
ऋतु वसंत जगिं फुलला
आम्र-गंध दरवळला
हृद्-कोकिल मूक तरी—बेसुर मन-वीणा ॥ १ ॥
हासत ये रवि गगनीं
तेजोमय हो अवनी
पथिक कुणी वणवण—करि मार्ग आकळेना ॥ २ ॥
खोल दरी उल्लंघुनि
पर्वत-पथ आक्रमुनी
मंदिरिं घे—जीव धाव, देव परि दिसेना ॥ ३ ॥
विश्रांति-स्थल आलें
सुख-सागरिं देह डुले
हाय ! परी हुरहुर कां हृदयिंची सरेना ॥ ४ ॥
अज्ञातांतून कोण
विंधितसे स्वैर हरिण ?
हृदयी शर खुपत सदा वेदना सहेना ॥ ५ ॥
धाव आतां सुख-सदना !
अज्ञाता ! चैतन्या !
आशेच्या आंदोलीं झुलविसि कां दीना ? ॥ ६ ॥

१९३४

## २८. सहसंवेदन : : लीलारति

वाहतो भरारा वारा पानांतुनी
ऐकवी मुकें हृद्गीत तुझें साजणी
भुरभूर चालले मेघ रिते अंबरीं
तव औदास्याची जाणिव देती खरी
हळुहळू सागरीं ऊर्मी हेलावती
तव शोक-तरंगा उकलुनि जणुं दाविती
तें शल्य तुझें मम हृदयींही खुपतसे
अन् चराचरीं सह-संवेदन दिसतसे
आलेंच, लाडके ! थांब गडे, दो क्षण
या भग्न मनांचें करुं दे चिरमीलन.

१९३४

## २९. निर्माल्य : : देवीर

हृदयाचें सिंहासन
रितें पडलें केव्हांचें
तिथें निर्माल्य हें साचे ॥ १ ॥

माझ्या भक्तीचें निर्माल्य
धरूनिया हृदयाशी
जगी राहीन उपाशी ॥ २ ॥

माझ्या हृदय-वेलीचें
तूंच एक गोड फूल
होवो कधीं न मलूल ॥ ३ ॥

माझ्या नैराश्याची आच
कोंडूनिया मनामाजी
कळी ठेवीन ही ताजी ॥ ४ ॥

हीच एक आस मनीं
माझ्या हृदयीची ज्योत
तुझ्या प्रकाशो मनांत ॥ ५ ॥

१९३४

## ३०. निर्धार : : देवीवर

सखे । नाही भग्न झालें
मन प्रेम-निराशेनें
परी अज्ञात-शरानें ॥ १ ॥

ध्येय-हानी ना आणीत
पाणी माझ्या नयनींचें
वेध लागले पूर्वीचे ॥ २ ॥

परी—तुझ्यासाठी सखे !
अज्ञाताचेंही बंधन
मुक्त होईन तोडून ॥ ३ ॥

तुझ्यासाठी माझ्या फुला !
दाबुनीया दुःखें पोटीं
हास्य आणीन मी ओठीं ॥ ४ ॥

१९३४

## ३१. मोहिनी : : सुरमंदिरा

अंत लागेल का त्वन्मनाचा मला ?
बघुनिया तारका
थांग लागेल का
खोल किति स्वर्नदी गम्य ना बुद्धिला ।। १ ।।
स्नात चंद्रामृती
ऊर्मि जरि नाचती
दाखवि न अंबुधी रत्न-संपत्तिला ।। २ ।।
हास्य मुखि पाहुनी
समजुं तरि काय मी !
समजुं अनुराग कां हृदयिं तव दाटला ? ।। ३ ।।
नयन वर्षति सुधा
फुलत जीवन-लता
मानुं कां विषय मी रम्य तव दृष्टिला ।। ४ ।।
सुप्त मम-भावना
हलवुनी क्षणक्षणां
त्यागि ना शेवटी चुरुनिया या फुला ।। ५ ।।
क्षणभरी मोहनी
मजसवें नाचुनी
लावशिल ठेवण्या हस्त स्वशिरी मला ।। ६ ।।

१९३५

## ३२. प्रभात--कालीं : : पादाकुलक

फुलवित भव्य जगन्मुकुलाला
अनिल सुशीतल धावत आला
रजनि तमोमय लपली पाहीं
जेवि निराशा माझ्या हृदयीं
आली आशा, प्रभात-तारा ॥ १ ॥

अरुण उधळितो गगनिं गुलाला
जेवि वदासि तूं मधु-वचनाला
क्षणिं मज तूं, रवि फुलविल भूला ॥ २ ॥

विहंग गाती, फुलें हांसली
सुहास्य विलसे तुझ्या कपोलीं
परिमल मम मनिं, जगांत भरला ॥ ३ ॥

हळु हळु दंवपट जाई विरुनी
रूढि-बंध जणुं अपुल्यामधुनी
ऊट, गडे किति उशिर जाहला ॥ ४ ॥

भूस अर्पि रवि सुवर्णमाला
जणुं मत्कंठी तव कर-माला
ऊठ, सख्या ! चल वंदूं प्रभुला ॥ ५ ॥

१९३५

## ३३. प्रीति-समाधि : : चंद्रकला

धवल कौमुदी ही। पाझरे नभांतुनी खाली
स्नेहमयी रजनी। मोहनी जगावरी घाली
दिव्य तारकांचा। वितानी फुलला नव-बाग
स्रवतो मधु खाली। शमविण्या जगांतील आग
चंद्र-कमल फुललें। कराया सेवा प्रीतीची
धारण करि धरणी। भूषणें असली नवतीचीं
उन्मादक श्वासें। भारिते विश्व रातराणी
उचंबळे मन हें। गावया कसलीशी गाणीं

× × ×

" मान टाकिली मी। तुझ्या जी स्कंधि आज राया।
तिथेंच ती राहो। पडे जरि मृत्यूची छाया
निंदेचा अब्धी। उफाळे स्वर्गि चढे लाट
तूंच दाविली ना। तयांतुनि सौख्याची वाट ?
पान पान गळलें। सुकोनी सौख्य-लता गेली
तूंच स्नेह-वृष्टी। करोनी पुनः बहरवीली
वाळवंट भवती। तृषेनें तळमळतां जीव
निर्झर होउनि तूं। जगविलें मानस-राजीव

× × ×

दूर नको जाऊं। तुझ्यास्तव येथ फुले फूल
तूंच घातली ज्या। प्रीतिदंव-बिंदूंची झूल
रूप तुझें बिंबे। पाकळी पाकळींत सुमनी
परागांत भरलें। स्पर्श--सुख तुझें तरंगांनी

रंग मनोहर हे । तुझ्या नव प्रीतींची छाया
मधुर तुझी वाणी । लागतो सुगंधही गाया
बैस इथें जवळी । वाहुं दे हृदयावरि सुमन
विरह तुझा न घडो । हेंच त्या देई वरदान ! ”

× × ×

“ मिटुनी घे आतां । सखे ! तव नेत्र--पाकळ्या गे
या मिटल्या कमली । जणूं मद्हृदय-भृंग गुंगे
नको नको आतां । आठवूं दुःखी गतकाला
सुकवतील माझ्या —। फुलाला त्या जळत्या ज्वाला
नको अश्रु डोळां । तयांना योग्य न भू--लोक
मम हृदयी प्रीती । तुझी हा तिलाच अभिषेक
हृदयी शिर ठेवी । तिथे त्या मिळेल विश्रांती
प्रियजन–हृदयी गे । लाभते तप्त मना शांती

× × ×

शांत विश्व झालें । शांत ही मानवतादेवी
तुला मला सखये ! । कोण गे जागृत मग ठेवी ?
जागासि कां ? नीज । नको पण उघड नेत्र बाई
नयनि तेज कसलें ? । बघूं, छे ! मला मीच पाही
अथवा ही कसली । जागृती नव्हेच जीवाची
ध्यान-मग्नता ही । प्रीतिच्या दिव्य समाधींची
बघूं एकमेकां । राखुनी असेंच चिरकाल
क्षणांत मग लग्नये ! । दिव्य ती प्रभात उजळेल ! ”

१९३५

## ३४. उभी मी कधिंची : : अभिमन्यू

उभी मी कधिची। कधिंची तव दारी
उघड ना दार वेड़ मंदिरी ॥ १ ॥
घेउनी फूल। हृदयाचें विमल
कंठिला पथ हा त्रिकाळ ॥ २ ॥
जगावरि भ्रमलें। भ्रमलें किति वायां
अतां परि शिणली मम-काया ॥ ३ ॥
दाविला मार्ग। मार्ग तुझा कोणी ?
सांगु का माझ्या दुःखांनी ॥ ४ ॥
गर्जिय तव आले। आले सम्राज्ञी !
प्रजाजन दीन तुझी म्हणुनी ॥ ५ ॥
रोखिती भाले। भाले तव दूत
विधिले दीना हृदयांत ॥ ६ ॥
उघड ना द्वार। द्वार देवबाले !
प्राण बघ व्याकुळ हे झाले ॥ ७ ॥
उघड ना द्वार। द्वार प्रीतिदेवी !
ना तरी प्राण-दीप विझवी ॥ ८ ॥
संपली रजनी। रजनी देवाची
उगवली प्रभात भाग्याची ॥ ९ ॥
कुणीसा दिधला। दिधला संदेश
"तांबडें फुटले पूर्वेस—!" ॥ १० ॥

× × ×

१९३५

## ३५. सांग येशील ना ? : : सुरमंदिरा

कळुनि मम भावना सांग येशील ना ?
सुमन तूं फुलविलें
परिमला पसरिले
स्वपदिं वाहूनि त्या तूंच घेशील ना ? ॥ १ ॥

खिन्न मम अंतरी
प्रीत तूं निर्मिली
स्वहृदि तेजास त्या ठाव देशील ना ? ॥ २ ॥

विजन विपिनांतरी
घुमविली बांसरी
ऐकवूं मधुर ते स्वर कुणा तुजविना ? ॥ ३ ॥

एकदां क्षण तरी
वद मला " आपुली "
अधिर मन स्मरत त्या नित्य दिव्य क्षणां ॥ ४ ॥

ना तरी प्रीतिचा
अग्नि-कण हृदयिंचा
धुमसुनी देहिं या संपवो जीवना ॥ ५ ॥

१९३५

## ३६. सलगीचे बोल : : देवीवर

राज्य तुझें जगावरी
कां मी पोरका एकला ?
नको असा राग धरूं
तुझ्या कृपेचा भुकेला ॥ १ ॥

तुझीं कोमल पाउलें
उमटती ठायी ठायी
क्षण तरी होऊं दे ना
धूलि-कण तुझ्या पायी ॥ २ ॥

खेळतेस खेळ किती
आकाशीच्या नीलजलीं
क्षण तरी घेऊं दे ना
बिंदूरूप तुझ्या भाली ॥ ३ ॥

रम्य तुझ्या उपवनी
होऊं दे ना मज फूल
नको धरूं शिरावरी
योग्य मज पद-तल ॥ ४ ॥

जगताची माऊली तूं
भक्तां घेसी अंकावरी
टेकूं का मी शिर क्षण
तुझ्या मंदिराबाहेरी ? ॥ ५ ॥

कर गळां घालूनीया
बोलतात बाळें तुझी
वाहूं का मी येथूनीच
माळ जीविताची माझी ? ॥ ६ ॥

तापे शिरी सूर्यबिंब
मुख तुझें झालें लाल
छाया करूं का मी क्षण ?
देह माझा मातीमोल ॥ ७ ॥

चालताना श्रमलीस
वाट गंड माळरानी
शांतवूं का स्वामिनीला
होऊनिया निर्झरिणी ? ॥ ८ ॥

प्रेमें अंध होई दास
सलगीचे बोले बोल
नको करूं क्षमा देवी !
तुझा रागही अमोल ॥ ९ ॥

× × ×

१९३५

## ३७. शांतता नको कधींच : : शुभवदना

शांतता नको कधींच जीवनांत माझिया
क्षण छाया क्षण प्रकाश
सुख-दुःखांचा विलास
नव रंगीं जीवन-पट सतत निघो रंगुनियां ॥ १ ॥
क्षण आशा हास्य करी
क्षणभरिं दुःखाश्रुसरी
रवि-किरणीं जलधारा चमकुं देत नयनीं या ॥ २ ॥
नौका ही भवसागरिं
लहरिवरी नृत्य करी
शक्ति धैर्य हृदयिं वसो वादळात विहराया ॥ ३ ॥
कधिं ध्यावी करिं कट्यार
शत्रुसवें समर घोर
करुनि विजय-सुमन मुदें अर्पावें प्रभु--पाया ॥ ४ ॥
देतां प्रभु संजीवन
खल-जिव्हा छेदो मन
हृदयाचा कोट खडा घाव सुखें झेलाया ॥ ५ ॥
मम जीवन-निर्झरिणी
खडकांतुनि खळखळुनी
उत्साहें गीत म्हणो जगताला रिझवाया ॥ ६ ॥

१९३५

## ३८. इशारा : : जीवनध्वनि पादाकुलक मिश्र

कधीं ना येइल खग हा करीं
वनोवनींचा लहरी राणा
चुकुनी आला तव उद्याना
सेवुनि सुमधुर या सुफलांना
जाइल निमिषी दुरी ।। १ ।।

मोहमयी घेऊनि लकेरी
हालवुनी तव मानस लहरी
वृत्ति करोनी तुझी बावरी
जाइल उडुनी परी ।। २ ।।

भाव-पंजरीं बद्ध कराया
करिसि यत्न परि जातिल वायां
बंध मात्र पडतिल तव पायां
मुकशिल स्वत्वा खरी ।। ३ ।।

कण धान्याचे स्वकरीं घेउनि
जाशिल धांवत खगामागुनी
बसेल क्षण जरि जवळ येउनी
टोचिल चंचू करीं ।। ४ ।।

इंद्र धनूसम रंग मनोहर
वीणेसम काढतो मधु स्वर
मृग सलिलाचे तरंग सुंदर
नव्हे सुखाची झरी ॥ ५ ॥

वसंत खेळे तुझ्या नसांतुनि
विमुक्त हो चल उपवन त्यागुनि
चंडोलहि येतील नभांतुनि
स्वागतार्थ भूवरी ॥ ६ ॥

१९३५

## ३९. जाईच्या मांडवाखालीं : : अंकूर

या जाईच्या रम्य मांडवाखालीं
मधु स्वप्नें मीं देखियलीं
शुभचरिता माझी जननी
गुंफीत बैसतां वेणी
गुणगुणत गोडशीं गाणी
मी बघत मला आंकीं तिच्या निजलेली
या दाट मांडवाखाली ॥ १ ॥

उगवत्या उषेच्या किरणीं
आशेची रचितां गाणीं
चाहूल ऐकिली कानीं
त्या प्रणयाची ओळख येथें झाली
बहरल्या मांडवाखालीं ॥ २ ॥

बदलते रंग संध्येचे
जणुं पैलु प्रेम-रत्नाचे
सुपथ कीं शांति-स्वर्गाचे
मनीं चित्रें ही सख्यासवें रेखियलीं
या-याच मांडवाखालीं ॥ ३ ॥

जीवन-पट उधळुनि गेला
मातृ-प्रेम-निर्झर सुकला
मम हृदय-चंद्र मावळला
मी भग्न मनें आज आसवें ढाळी
या भग्न मांडवाखालीं ॥ ४ ॥

मम सुख–दुःखाच्या काळीं
ममतेची पाखर घाली
स्मृति-कुसुमांकित ही वेली
मज येऊं दे नीज इथें शेवटली
पाहिन मग स्वप्नें पहिली ॥ ५ ॥

१९३५

## ४०. सुकलेला अश्रु : : लवंगलता

शुभमंगलमय समय तुझ्या हा जीवितांतला राया !
कसा दाखवूं मोद, कोणता नजराणा धाडुनिया ?
सम्राटाचा रत्नहार जरि शोभवितो प्रभु-कंठ
तरि गरिबाच्या दूर्वांचा का येइल प्रभुला वीट ?
रत्न-हार मम हरपुनि गेला, दूर्वा करपुनि जाती
सुकलेला हा एकच अश्रू म्हणुनी देतें हातीं
गत-स्मृतीची विझुनी गेली आतां भडकति ज्वाला
खूणहि त्यांची पुसुनी जाया अश्रू हा टाकियला
शुद्ध जाहला चित्त-पट अतां लिही तयावरि नांव
सदा प्रिय तुला होउनि नेवो पैलथडी तव नाव
ऐलथडीहुन दर्शन घेइन कधी तुझ्या चरणांचें
हंसुनि पाहशिल क्षण तरि मानिन सार्थक आयुष्याचें
अखेर तोडुनि जड-देहाचे बंधन जीव-ज्योती
तव ज्योतीमधिं लीन होउनी मिळेल मातित माती
शुभ मंगलमय समय तुझ्या हा जीवितांतला देवा !
आकल्पांतहि शुभमंगल हो-घे शेवटची सेवा.

१९३५

# ४१. ती— : :

देवीवर

कोठें तरी पल्वलांत । कमलिनी जन्म घेई
कोठें तरी दारिद्र्यांत । प्रभु तिला जन्म देई ॥ १ ॥

कोठें तरी काळोखांत । उगवला अंशुमाली
कोणी तरी उमलवी । तिच्या जीवनाची कळी ॥ २ ॥

कोठें तरी इंद्रचाप । उजळलें आकाशांत
कोणी तरी रंगविला । तिच्या जीवनाचा पट ॥ ३ ॥

कोठें तरी माळरानी । उमटला वेणु नाद
कोणी तरी घुमविला । तिच्या मनीं पडसाद ॥ ४ ॥

कोठें तरी स्नान घाली । अवनीला जलदेव
कोणी तरी तिच्यावरी । करी प्रेमाचा वर्षाव ॥ ५ ॥

कोठें तरी अवसेला । आकाशांत लपे इंदू
कधीं तरी सुकवीत । मृत्यू तिचा जीव बिंदू ॥ ६ ॥

× × ×

कोठें एक वनलता । वन सुवासानें भरी
साधी सुधी कहाणी ही । मला उदास कां करी ?

१९३६

## ४२. प्रीतीची चाहूल : : केशवकरणी

कुणी कुणास्तव कधी गुंफितें अश्रुमाळ लोचनीं
मानि त्या हार हिऱ्यांचा कुणी
कुणी कुणास्तव कधी मुखांतिल घास ठेवि काढुनी
कुणाची क्षुधा तृप्त हो क्षणीं
कुणी सुमनमालिका प्रीतिपदीं अर्पितें
कुणी सुयश सुनिर्मल वाहुनिया पूजितें
प्रीतीस अर्पि कुणि तनु-मन-संपत्तितें
कुणी कुणाला नेत्र-निरांजन ओवाळी भक्तिनें
दिसे पथ कोणा त्या दीप्तिनें ॥ १ ॥

बघुनि प्रीतिचा खेळ असा हा बावरलें अंतर
पाहतें कळवळुनी भिरभिर
घेउनि संगें भावसखी अन् संपत्ती "मीपण"
व्याकळुन शोधी जगतांतुन
रम्य विलासी, राजमंदिरें वनोवनी शोधिलें
परी ना मज माझें गवसलें
दाबुनी निराशा तशीच हृदयांतरीं
वाहिलें तनू-मन जनता-चरणावरी
ये उदयी आशा, हंसे कुणी अंतरी
क्षणीं त्याच ये हळूच हृदयीं प्रीतीची चाहुल
उमटलें कीं प्रभुचें पाउल ॥ २ ॥

१९३६

## ४३. जीवन-चित्र : : ‘ शुभवदना ’बदलून

सखये ! चल रंगवुं ये चित्र जीवनाचें
पार्श्वभूमि मी सुंदर
तुज भवतीं वनराजी
खेळ गडे, खेळ मधुर
वनराणी तूं माझी
भरुं ये हळुवार करें रंग भावनांचे ॥ १ ॥

चल काढूं चित्र सखे ! जलधि-विहाराचें
नील, शांत मी सागर
तूं चंचल जलदेवी
मम हृदयीं नौका तव
ये झडकरिं पद ठेवी
दाबुनि हृदिं वादळ तुज पैल न्यावयाचें ॥ २ ॥

रेखुं गडे ! चित्र भव्य जीवित समराचें
दीनास्तव झगडणार
वीरमती तूं समरीं
शत्रु-कंठ छेदाया
होइन मी शस्त्र करीं
समताध्वज दाविल यश चित्रलेखिकेचें ॥ ३ ॥

सखये ! चल रंगवुं ये चित्र अखेरीचें
राहुनि अज्ञात नित्य
तव सुकीर्ति-मंदिरास
शिल्पकार होइन मी
पाया दृढ विरचिण्यास
प्रीति म्हणे हेंच चित्र सफल जीवनाचें ।। ४ ।।

१९३६

## ४४. माझं गुपित : : वर-मंगला

व्यर्थ कां उधळिसी स्मित-सुमें मजवरी ?
हास्य-लास्यहि तुझें व्यर्थ जाइल परी
मूक कलिका हृदीं गंध मधु लपविते
मूक हो मन्मना नित्य मी शिकवितें
जलधि दिसतां पुढें नयन मी फिरवितें
मृगजली श्रांत तनु होउनी पोहतें
घेउं दे मिटुनिया अधर सखये ! मला
गुपित तें सांगतिल भुलुनि तव प्रीतिला

× × ×

छे ! नको विनवणी–नयनिं कां आसवें ?
सोड सखि, हट्ट हा हांस माझ्यासवें
उदयिं येतां रवी कमलिनी हांसती
सदनिं येतां कुणी नेत्र मम चमकती
मेघ-चपला मला हंसवि अपुल्यासवें
अश्रुमाला फुले नयनिं रजनीसवें
घेउं दे मिटुनिया नयन सखये ! मला
गुपित ते सांगतिल भुलुनि तव प्रीतिला

× × ×

आजवरि गुपित जें हृदयिं या कोंडिलें
वदविसी लाडके ! मन्मुखें कां बळें ?
सांग मिटवूं कशी उमलता मोगरा ?
शांतवूं वद कशी खवळल्या सागरा ?
गीत-रंगीं कशी थांबवूं कोकिला ?
दीप विझवूं कशी तनु-मनीं पेटला ?
असह होतात या हृदयिंच्या वेदना
असह होतात या सौख्य-संवेदना
सोड मज ! सांगुं दे कानिं मृत्यूचिया
गुपित अव्यक्तपटिं लिहुनि ठेवावया !

१९३६

## ४५. सहचरी तुझी मी— : : लीलारति

मी तुझीच ना रे कां मग बघसी असा ?
वद शंका कसली, दुखवी तव मानसा ?
  जायचें कुठें मी विचारलें कां कधीं ?
पाउलीं तुझ्या निर्भींत पदां टाकणें
सहचरी तुझी मी विश्व सुनें तुजविणें

× × ×

उपवनी नेइ वा उजाड माळावरी
चल प्रासादीं वा पर्णकुटीला वरी
  परि मागें वळुनी पाहिन ना मी कदा
खिळवुनी लोचनें तुझ्या पुण्य-पाउलीं
चालतां वाटतिल स्वर्ग-सुखें लाभली

१९३६

## ४६. प्रपातास— : : वागीश्वरी

कुठें रे प्रपाता ! असा धावतोसी
करीं घेउनी हांसरीं हीं फुलें।
तशीं जीर्ण पानें, लता, क्षुद्र रोपें,
खणोनी तयांचीहि पाळेंमुळें।
कुठें पर्वतांतून या डोंगरांतून
जासी असा शीघ्र तूं धावत !
तटां गदगदां हालवोसी बलानें
जणूं वीज मेघासि ये फाडित
कसा ऐकसी ना तुला आडवीती
उभारूनि बाहू जुने वृक्षही ?
धडाडोनि त्यांच्यावरी आदळोनी
कुठें ओढिसी रे बळें त्यांसही ?
पहा ही वनश्री कशी ढंग दावी
जणूं मोहवी अप्सरा तापसा
जरा गर्जना थांबवी-ऐक ! पक्षी
कसा घेति आलाप गंधर्वसा
तुझें एक पाऊल व्यापी दऱ्यांना
दुजें शोधितें मार्ग कोठें नवा
पुढें हा कडा ! थांब—कां हासतोसी ?
उडी टाकण्या भीति नाही जिवां ?

तुझी ध्येय-मूर्ती कुठें सांग वीरा !
कुणासाठिं रे दिव्य संग्राम हा ?
कुणा कारणें सौख्य-संन्यास सारा,
कुणा पूजिण्याची मनाला स्पृहा ?
" पिता काल माझा असे थोर; बाले !
सती चंडिका क्रांति माता मम
स्वसा लाडक्या या कला आणि विद्या
सवें चालती मार्ग हा दुर्गम
कुणी रंजले गांजले बंधु माझे,
असूं गाळिती दीन माता गृहीं
तयांसाठिं हा घोर संग्राम माझा—
तयांसाठिं वेचीन सर्वस्वही
कुणी मत्त श्रीमंत लत्ताप्रहारें
शिरें रक्त-बंबाळ यांचीं करी
कुणी दुर्बलां रूढिचें मद्य पाजी,
कुणी शृंखला ठोकिती तत्पदीं
तयांचीं मुळें उन्मळोनी, कुणाला
पदीं दापुनी जिंकुनीयां खलां
" करूं सौख्य-द्वारें खुली बांधवांना "
असे हीच आशा मनीं उज्ज्वला !

१९३६

## ४७. खुळी हौस : : देवद्वार

सुखाच्या उद्यानीं। हातांमध्यें हात
गुंफूनी मोदांत। क्रीडा केली
आंदोळीं दोलन। लाटांवरी नाच
केला दोघांनींच। स्वच्छंदानें
रागाच्या, प्रेमाच्या। गोड गुजगोष्टी
एकमेकां ओठीं। सांगीतल्या
पळभर नाहीं। विसंबलों कधीं
विश्व दोघांमधी। देखियेलें
सुख-वर्षावानें। परी रे राजसा!
वाटे जीव माझा। भारावला
आतां वाटे क्षण। माझ्या लाडक्यानें
दूर दूर जावें। देशांतरी
जगाच्या कल्याणा। अमोघ साहस
करूनि घरास! यावें तुवां
जीवाची आरती। ओवाळावी तुला
घालावी रे गळां। जय-माला
गोड संगतीचा। वियोगही गोड
पुरवील कोड। अंतरींचें
नाहीं ना रे परी! आला राग तुज
माझी खुळी हौस। परिसुनी.

१९३६

## ४८. विहगास : : वसंततिलका

येतां वसंत नटवीत मुदें जगाला
येईल रे मधुरता तव जीवनाला
घेशील उंच गगनी सखया ! भरारी
ओतील अमृत तुझी मधुरा लकेरी १

जा जा वरी खगवरा ! त्यजुनी घरेला
भारूनि टाकि मधु गायनिं अंतराला
संगीतिं दे बुडवुनी नभिं विश्वगोला
राहो परी स्मरण एक तुझ्या मनाला २

कोणी बसूनि तरुकोटरिं एक जीव
त्वद्गान एक निज जीवित हाच भाव
चित्ती धरूनि समजे निज आयु धन्य
त्राता तया तुजविना वद कोण अन्य ! ३

नाही कुणी जगतिं त्या सुख सांगण्याला
नाहीच वक्ष श्रमले शिर टेकण्याला
चुंबोनि हास्यवदना प्रमुदेल कोण ?
शोकाश्रुही निजकरें पुसणार कोण ! ४

प्रार्थी सदैव विहगा ! तुज तो म्हणून
ना थांबवी कधिंहि रे तव दिव्य गान
पाहूनि उच्चपद ऐकुनि गायनाला
कंठील तो मुदभरें जड जीवनाला ५

१९३७

## ४९. एका रात्रीं—   :   :   हरिभगिनी

रात्र टाकिते कशास उघडी दौलत अपुली आकाशीं
वैभव दावुनि पटवुनि द्याया हीनदीनपण मनुजासी
विराट् स्वरूपा ! तुझ्या मनांतिल विचारतारा शीतल या
मानव–मनिंचे विचार – छे ! हे अग्निकणच तनु भाजाया
मधु हास्याचें विरल आवरण घालुनियां हृदयावरती
लपवावे दुःखाचे डोंगर हीच असे अमुची रीती
बुद्धिबलाचा खेळ गमे हा सतत चालतो जगावरी
दुबळी ठरते इथें भावना मात बुद्धिची तिच्यावरी
सुख कसलें जगिं कांचनमृग हा भुलवितसे जननयनांला
कसें आवरूं मना ! तुला रे, वारा कधि करिं सांपडला ?
भावनेस मधु मधुर प्रीतिच्या समजावें जीवितनाथ
गाळावे शयनावरि अश्रू होउनियां दुःखें श्रांत
प्रीति नव्हे परि सदाफुलीची लतिका संतत फुलणारी
प्रीति-कळी मृदु निःश्वासानें फुलणारी अन् सुकणारी
संसृति--सागरिं वादळ होई; नावाडी भिरभिर बवतो
दीपगृह ज्या मानि बिचारा हिम-पर्वत भीषण ठरतो
गतकालाच्या सुख--स्वप्नांचा नाच टाकितो गुंगवुनी
भविष्य दाविल काय काय हा ध्यास लागतो नित्य मनीं

रहस्य कोमल रंगविणारा मूकचित्रपट जिवाचा
सरला ! झालें नाटक सगळें ! छायेला फुटली वाचा !
प्रकाश सरतां केवळ पडदा भयाण दिसतो नयनाला
गीत, नाद कानांस मोहवी, अर्थ दुखवितो हृदयाला
भाव बोलतो पटे न हृदया, भक्ति श्रद्धा थरथरते
फल करिं येतां तपस्येंतली अतुल माधुरी ओसरते.
कळुनी सगळें जीव झुरतसे हृदयीं धरुनी मृदु भाव
खेळ अग्निसी करुनि जळावें जिवंत ही त्याची हांव
कुठें लपावें कुठें पळावें मन:शांतितें शोधाया ?
चढेल कळसहि या भुवनाचा डळमळणारा परि पाया

१९३६

## ५०. लपंडाव : : देवीवर

लाल गुलाब खुडुनी । दिधलास माझ्या हातीं
कां ग तुझिया कपोलीं । लाल गुलाब फुलती ?
दाखविसी मज रम्य । चित्रें स्वतां रेखलेलीं
परी तुझी कां ग दृष्टी । माझ्या मुखीं खिळलेली ?
वदतेस पुनः पुन्हां । बोलायाचें किती किती
एवढेंच बोलुनी कां । कुंठली ही सरस्वती ?
सान बंधूला वदसी । "घरी जाऊं झाला वेळ"
परी माझ्या दारांतूनी । उचलेना कां पाऊल ?
मुखीं गोड फुललेले । अंतरींचे मूकभाव
बोल गडे एकदांचे
पुरे झाला लपंडाव !

१९३७

## ५१. काळ जाई दूर— : : देवीवर

काळ जाई दूर दूर । स्मृति--रत्नांना चोरून
कोठवरी धावूं तरी । जीव गेला हा शिणून
नित्य जळत्या भावना । मागतील स्मृति--धन
हाय ! काय देऊं तरी । जीव घेतील शोषून
मेघ पांगती क्षणांत । सुटूनियां चंड वारा
स्मृति--फुलें काळ टाकी । उधळून सैरावैरा
रंजविल्या फुलविल्या । ज्यांनीं भावना स्नेहाळ
हृदी कोरलेलीं लेणी । करी विरूप हा काळ
वाटे मद्य प्याला जीव । विस्कटल्या स्मृति मनीं
दृष्टीतून निसटती । जसा पारा करांतूनी
अस्पष्टसें होई चित्र । धुवूनीयां अश्रुजलें
कोठुनीयां आणूं पुनः । दिव्य रंग नी कुंचले ?
क्षय लागे भावनांना । भिवविते अमावास्या
पौर्णिमा का येईल या । पुनः जीवनी उदया ?

१९३७

## ५२. मजविना अपूर्ण तव जीवन : : केशवकरणी

सुखदुःखाच्या आठवणींनी चित्रित झालें मन
राहतें तुझ्यामधें गुंतुन
स्थापुनी तुला या हृदयमंदिरामधी
पूजनीं लोटिले क्षणही लक्षावधी
सुख काल्पनिकहि तें उसळवि सौख्योदधी
त्याच सुखाच्या तरंगावरी तरंगतें जीवन
जसा की सुगंध पवनांतुन ॥ १ ॥

निज प्रीतीचा तुटुनी धागा तपें लोटिलीं जरी
विस्मृती करि न कृपा मजवरी
तुजभवति सुखाचा मोह-नाच चालला
ती सायंकाळ न स्मरेल कधिंही तुला
मी त्यजुनि तुझा कर यज्ञिं देह टाकिला
स्मरेल तुज की हेंच "स्त्रीची जातच फसवी असे"
दाखवूं हृदय खोलुनी कसें ॥ २ ॥

संसारीं मी रमलें म्हणुनी समजशील दुर्बल
परि न ही सुमशय्या कोमल
लढुनियां मनाशीं विजयश्री जिंकिली
आतपीं उभी मीं दिली तुला साउली
या यज्ञभूवरी सुखास दिधलें बली
यज्ञज्वाला तुला न दिसतिल, दिसेल तुज लोचनीं
भरे जो प्रकाश मम जीवनीं ॥ ३ ॥

अनाघ्रात मनपुष्प तुझें मज दिलेस एके दिनीं
अतुल ती प्रीति चिरंजीविनी
वाढवी पसारा विभवाचा किति तरी
कीं निजज्ञानाचा ध्वज फडकावी वरी
की प्रेमाचेही जमवि किती विणकरी
जीवनसंध्या येइल तेव्हां येइल क्षणही असा
होशिल माझ्याविण तूं पिसा ॥ ४ ॥

अज्ञाताची भव्य द्वारें उघडुनियां ज्या क्षणी
बोलविल मज तुज कुणि यक्षिणी
बघशील मनाचे नेत्र तदा उघडुनी
जातील स्मृतीची स्वप्नें मग तरळुनी
मन्मूर्ति पाहशिल प्रीति-सुधा-स्यंदिनी
त्याच क्षणाला पटेल तुजला मीच तुझी मैत्रिण
मजविना अपूर्ण तव जीवन ॥ ५ ॥

१९३८

## ५३. जीवित--हार : : अंजनीगीत

आयुष्याच्या रम्य प्रभातीं
बाग गुलाबी फुलली होती
युव-युवतींनीं खुडिलीं हातीं
असंख्य प्रीति--सुमें

मग दोघांनीं मुग्ध मनांचा
तंतु घेउनी हृद्भावांचा
प्रयत्न केला गुंफायाचा
हार जीविताचा.

आशा--आकांक्षांचीं पानें
हिरवीं कोमल मृदुल करानें
मधुनि गोविलीं कौशल्यानें
दोघांनीं मिळुनी.

संस्काराविण लग्नविधीच्या
अपुरा राही हार तयांचा
सुकुनि उडाला रंग सुमांचा
तसाच पर्णांचा.

असे न तें जर अपुल्या दैवीं
जन्मवरी कां खंत करावी ?
भविष्यांत कां नच फुलवावीं
सौख्याचीं सुमनें ?

मग नेत्रींचें शिंपुनि पाणी
विवेकतरु फुलविला तयांनीं
निज मैत्रीच्या शुभ्र फुलांनीं
कौस्तुभ शोभविला.

अर्ध गुलाबी अर्ध धवलतर
सत्य--शिवाचें स्वरूप सुंदर
ध्येय--देवता--कंठिं मनोहर
शोभे जीवित--हार.

१९३८

## ५४. कधीं मज वाटे—        :    :    देवद्वार

कधीं मज वाटे । दुःखाच्या लहरी
थोड्या मजवरी । पाझराव्या
माझे मृदू कर । करांत दाबूनी
तूं मधु वचनीं । शांतवावें
केशपाशावरी । तुझ्या नेत्रांतूनी
आसवांचे मणी । ओघळावे
आणि माझे अश्रू । आपुल्या वसनें
हळुवारपणें । पुसावे तूं
सख्या ! तुझ्या हृदीं । मस्तक टेकून
शांतवून मन । आनंदावें.

१९३८

## ५५. प्रतिस्पर्धिनी : : शार्दूलविक्रीडित

" नेत्रीं आसु कशास हे प्रियसखे ? "
" रागें तुवां पाहिलें "
" लाली ओसरली कपोलयुगुलीं ? "
" ना तूं तया चुंबिलें "
" कां ऐसा अवतार ? "
" तूं करिसि कां दुर्लक्ष्य माझ्याकडे "
" प्रीती कां सरली ? "
" मुळीं न, परि ती अन्य स्थलीं गे जडे."
माझें चित्त तुझ्याकडूनि सखये !
चोरूनि नेलें कुणीं "
" सांगा कोण तरी असे
सवत ही माझी प्रतिस्पर्धिनी ? "
" काळे कुंतल, कांतिमान्
तनु दिसे डोळे निळे शोभती
गालीं रम्य गुलाब ते
अधर ही पीयूष कीं वर्षती
तें सौंदर्य बघूनि तूंहि
सखये ! वेडीपिशी होशिल
अन् रागा सगळ्या त्यजूनि
सुमुखा पूजावया येशिल "

" मी ना सत्ययुगीन आर्य—
महिला पूजावया त्वत्प्रिया "
" ये ये सत्वरिं देख मूर्ति
निजली जी मंचकीं माझिया "

" आं ? हें कोण ? "
" असे सुहास अपुली ही ज्योत दो जीवनीं
ही माझी मनचोर आणिक सखे !
तूझी प्रतिस्पर्धिनी ! "

१९३८

## ५६. बाळ ! मजसि निरखुं दे : : शुभवदना

धरुनि वदनकमल करीं बाळ ! मजसि निरखुं दे.
पिउनि जहर जगतांतिल
वठुनि जात हृदय-वेल
चुंबुनि तव अधर--सुधा संजीवन लाभुं दे ॥ १ ॥
ऐकुनि कटु कठिण बोल
बधिर होत श्रवण–युगुल
अस्फुट मधु बोल तुझे श्रवुनि तृप्त होउं दे ॥ २ ॥
मत्सरयुत नेत्रबाण
साहुनि हो व्याकुल मन
प्रेमजलधि नयनिं तुझ्या त्यांत नित्य न्हाउं दे ॥ ३ ॥
जगताचा कोलाहल
ढळवि शांति हृदयांतिल
शांतिरूप चिन्मंगल बाळ ! हृदयिं कवळुं दे ॥ ४ ॥

१९३८

## ५७. पाऊलवाट : : केशवकरणी

परक्याची पाऊलवाट ही मान्य नसे मज मुळीं
बनविन वाट मीहि वेगळी
हा आयुष्याचा डोंगर माझ्यापुढें
मी तुडवुनि जाइन तुंग तयाचे कडे
दाबुनी पाउलीं सुखदु:खांचे खडे
आशा-आसक्तीचे कांटे चेपुनियां पदतलीं
बनविन वाट मीहि वेगळी ॥ १ ॥
निज रक्ताचा सडा घालुनी स्वकरें मार्गावरी
रंगविन पथ स्नेह--रविकरीं
सिंचुनी थोडकीं नयनींचीं आसवें
फुलवीन मधुनियां पुष्पांचे ताटवे
ते जनां अर्पितिल सुगंध पवनासवें
प्रेम--निर्झरा घालुनि वळसे वाट पुढें चालली
जिवाच्या अंतिम सौख्यस्थलीं ॥ २ ॥
कां परक्याच्या चाकोरींतुन न्यावा जीवन--रथ ?
नये कां निर्मु स्वबलें पथ ?
पाऊलवाट ही माझी माझ्यास्तव
दावील जगाचें रूप मला वास्तव
देईल नित्य मज स्वबलाचा आठव
अनुभूतीच्या रत्नखनीला जिंकित ही चालली
सहचरी खरी जीवनांतली ॥ ३ ॥

१९३८

## ५८. बाळ ! ऊठ. : : मधु मधुरा

अजुनि कशी नयनींची नीज न तव सरलि गडे
तिमिर पळे दूर, भरे सुप्रकाश चोंहिकडे.
सारुनि दुरि दंवदुलई
सृष्टिबालकें हंसतीं
मंद मधुर गाउनियां पक्षि तुला बोलविती ॥ १ ॥
रजनीची जादुगिरी
रंगालि अजुनी नयनीं
स्वप्न--सृष्टि गोड तुझी भंगली न अजुनि कुणीं ॥ २ ॥
केश शिरीं भुरभुरती
ओष्टद्वय स्मित करिती
अर्ध--स्फुट नेत्रदलें धुंदि गोड दाखविती ॥ ३ ॥
कथिली कां गोड कथा
यक्षकिन्नरें तुजसी ?
पंखावरि बैसवुनी नेइ परी आकाशीं ? ॥ ४ ॥
त्याच परीनें दिधला
मोहक हा वेष तुला ?
भुलवाया कां जनास शिकविलि तुज दिव्य कला ॥ ४ ॥
मोहनि ही ऊठ पुरे
उजळवि गृह हास्यभरें
उधळुनि मधु बोल भरी सुप्रकाश चोंहिकडे ॥ ५ ॥

१९३१

## ५९. समांतर प्रवाह : : देवीवर

आलों समोरासमोर
दैवयोगें वाटे मला । आणि स्नेह संपादिला
केली देवाण घेवाण
दुरदुरूनि सौख्याची । तशी गडे आसवांची
दोन तरूवरी चाले
चिवचिव पाखरांची । वृत्ति रंगली दोघांची
हृदयींचें गोड गूज
ऐकूं दुरूनी असेंच । नको मनीं दुजी आस
तारा पृथ्वी प्रीतीसाठीं
उडी घेई स्वर्गांतून । पडे पाषाण होऊन
नको आस संगमाची
घात करील आपुला । प्रीति जाईल लयाला
स्वप्न असेल असूं दे
भंगूं नको, आण माझी । पूजा मोडेल जन्माची
समांतरेंच प्रवाह
जावो अखेरपर्यंत । नको संगम वा अंत !

१९३९

## ६०. वदतात लोक सारे : : आनंदकंद-अनुरागमिश्र

वदतात लोक सारे । न पटे तुझें नि माझें
मत्प्रेमभाव त्यांना । उकलून दावुं कैसे ?
हें जाति-पुष्प साधें । रसिकांस मोहवीतें
मत्भावरूप साधें । प्रिय, मान्य, पूज्य तूंतें
रवि हस्त-स्पर्श होतां । येतें हंसूं फुलाला
सांगावयास जाती । तें प्रीत का जगाला ?
प्रेम–प्रवाह जो या । गुंफीत दो जिवांतें
न दिसे जगा म्हणोनी । कां गाळुं आसवांतें ?
असुं दे तुझी नि माझी । ही प्रीत गूढ गुप्त
परि हीच गुप्त गंगा । करि जीवना पुनीत
म्हणुं देत लोक सारे । न पटे तुझें नि माझें
न मिळे गमे तयांना । जगिं आपणां मिळे जें

१९४०

## ६१. चाललें तिकडे रणकंदन : : जाति-केशवकरणी

क्रांति-उषा उजळे युवका ! कर पुरें ! प्रणयकूजन
चाललें तिकडे रणकंदन
चल जाति-सुमांची सुखशय्या त्यागुनी
सुख-पाश तोड चल, शस्त्रास्त्रें परजुनी
ही पहा पेटली स्वातंत्र्याची धुनी
'प्रिये' 'लाडके' सोड मंत्र हा "हरहर" चल गर्जुनी
बोलवी क्रांति असुरमर्दिनी ॥ १ ॥
रणभेरींचा नाद घुमव चल शिर घेउनियां करीं
दचकुनी उठेल तव सहचरी
ही प्रिया तुझी नच भोगदासि-भूषण
ही रणचंडी तव जीवित-रण-रागिण
येईल लढाया करांत कर घालुन
दास्यबंधनें तोड, मुक्त करिं पंजरस्थ सिंहिण
चाललें तिकडे रणकंदन ॥ २ ॥
संपत्तीचा, अधिकाराचा मद उतराया झणीं
पुढें हो समताध्वज घेउनी
येतील बंधु हे अनुचर तव होउनी
निज जीवित-पुष्पें राष्ट्रपदीं वाहुनी
शृंखला तोडतिल निज रक्ता सांडुनी
त्या रुधिराच्या बिंदुगणिक मग फत्तरही उठतिल
लढाया वीररूप धरतिल ॥ ३ ॥

१९४०

## ६२. माझें बाळ : : अंजनी

बाळ हांसलें । ग । तेज फांकलें
मुखमंजुषेंत हिरे कोणीं ठेविले ॥ १ ॥
बाळ बोललें । ग । चित्त मुललें
मुरलीच्या मंजु नादें जणूं मोहिलें ॥ २ ॥
बाळ नाचलें । ग । नाचलीं फुलें
विसरूनी मोठेपण मीही नाचलें ॥ ३ ॥
बाळ धांवलें । ग । मृग लाजले
काळ्या मृदु कुंतलांची झालर डुले ॥ ४ ॥
बाळ पडलें । ग । मोतीं सांडले
नयनांच्या शिंपल्यांत देवें ठेविले ॥ ५ ॥
हृदीं धरिलें । ग । बाळा चुंबिलें
गाऊनी मीं गोड गाणें त्या झोंपविलें ॥ ६ ॥

१९४०

## ६३. जेधवां ही पावसाळी ये हवा : : मेनका

जेधवां ही पावसाळी ये हवा
भासतें सान्निध्य तूझें तेधवां
जेधवां हे मेघ करिती गर्जना
धीर तूं देतोसि वाटे मन्मना
जेधवां ही वीज करिते नर्तना
प्रीतिची कीं मूर्ति तुझ्या मोहना !
नाचवी वर्षा जसा या सागरा
भावना तूं मन्मनींची आतुरा
वादळीं लोटीन नौका जेधवां
तेधवां होशील ना तूं नाखवा ?

१९४१

## ६४. अशी व्हावी रे वहिनी— : : तुलसी

अशी व्हावी रे वहिनी । स्फूर्ति तुझ्या हृदयाची
अन्नपूर्णा दुबळ्यांची । जीवनांत ॥ १ ॥

अशी व्हावी रे वहिनी । जिच्या एका कटाक्षानें
फुलतील उपवनें । संसाराचीं ॥ २ ॥

अशी व्हावी रे वहिनी । जिच्या एकाच बोलानें
जग जोडेल नात्यानें । प्रेमभावें ॥ ३ ॥

अशी व्हावी रे वहिनी । मंजूषाच कस्तुरीची
कीर्ति तुझिया कुलाची । पसरील ॥ ४ ॥

अशी व्हावी रे वहिनी । हिरे-माणकांची खाण
पुत्र व्हावे तेजःकण । चंद्र-सूर्य ॥ ५ ॥

× × ×

आली परक्याची लेक । सोडूनियां मायबापा
प्राणापरी तिज जपा । मायबाई ॥ ६ ॥

आली परक्याची लेक । सोडूनियां ताईभाऊ
नका तिला हो दुखवूं । कटु बोलें ॥ ७ ॥

आली परक्याची लेक । सोडूनियां कुलगोत्र
धरा ममतेचें छत्र । तिच्यावरी ॥ ८ ॥

× × ×

चंद्र भाऊराया माझा । तूं ग चांदणी वहिनी
नांदा सुखानें प्रांगणीं । संसाराच्या ॥ ९ ॥

माझें माहेर मायेचें । वहिनीबाई तुझ्या हातीं
मोलाचे ग हिरे मोतीं । भाऊ माझे ॥ १० ॥

तुझ्या सुखाचा मंडप । कोणी उभारिला भाई
उभी कोणाची पुण्याई । पाठीमागें ॥ ११ ॥

साहूनियां ऊन पाणी । अंकूर हा जोपासिला
छाया करो माऊलीला । वृद्धपर्णीं ॥ १२ ॥

१९४१

## ६५. बंधमुक्ता : : लीलारति

कुणि गोंजारुनियां घालि स्वर्ण भूषणें
तनु लवे, प्रगति-पथिं अशक्य हो चालणें
मी विनवित सकलां उतरा ओझें कुणीं
तों प्रीतिदेवि मजवरी रोखि लोचनें
अन् खळकन् तुटलीं क्षणांत तीं बंधनें !

१९४२

## ६६. वर्षादृश्य : : लीलारति

या वर्षाकालीं ताम्रवसन लेवुनी
खळखळती तटिनी पर्वतकुहरांतुनी
जणुं भीषण युद्धें आंग्लदेवि वावरे
मुख हिंददेविच्या वक्षिं तिनें लपविलें
अन् केशपाश तांबूस तिचा सळसळे !

१९४२

## ६७. ऊठ समरिं जाया : : शुभवदना

त्यजुनि कवळ वदनींचा ऊठ समरिं जाया
मातृभूमि देइ हांक
उठले बध पुत्र लाख
नवयौवन उसळो तव शत्रुसि झुंजाया ॥ १ ॥
शस्त्र अहिंसा अपुलें
सत्याग्रहि वीर-दलें
सेनानी कृश ऋषिवर सुयशपथीं न्याया ॥ २ ॥
हें अपूर्व शांति-युद्ध
आश्चर्ये बघत जगत
ऊठ ! अंशभागी हो नवयुग स्थापाया ॥ ३ ॥
प्रिय तुजहुनि देशधर्म
करविति कर्तव्यकर्म
ऊठ ' हिंदपुत्र ' जगीं म्हणवुं नको वायां ॥ ४ ॥
ऋण विमुक्त होउनि ये
पाकसिद्धि करुनि स्वयें
भरविन तुज ऊठ बाळ ! तोडुनि ही माया ॥ ५ ॥
म्हणुं नकोस मज कठोर
मी अबला, तूं सुवीर
ये विजयी होउनि मम आसवें पुसाया ॥ ६ ॥
हुंगूं दे मस्तकास
बोलूं दे आशीर्वच
कवचकुंडलें अक्षय देवो प्रभुराया ॥ ७ ॥

१९४२

## ६८. तुला पाहून— : : साकी-पादाकुलक मिश्र

मधुर मधुर स्मृति फुलल्या – हृदयीं ॥
तुझ्या दृष्टिनें, तुझ्या दर्शनें
अस्फुट एकच मधु बोलानें
जादुगिरीनें भुलल्या – हृदयीं — ॥ १ ॥
कीं लतिकेवर कलिका हंसल्या
अंबरिं किंवा तारा खुलल्या
भावजलधिमधिं न्हाल्या – हृदयीं— ॥ २ ॥
उदास--सुंदर कीं संध्येसम
प्रसन्नवदना उषा मनोरम
मूर्तरूप स्मृति झाल्या—हृदयीं— ॥ ३ ॥
चिर यौवनयुत अप्सराच या
इंद्रपुरी दाविति नित हृदयां
नयनां जरि नच दिसल्या-—हृदयीं — ॥ ४ ॥

१९३५

## ६९. चाहूल : : ललारति

शून्यांत अंबरीं शून्य नजर खिळवुनी
मी उदास हृदयें बसतें सायंतनीं
  ना दिसे किनारा अनंत भवसागरीं
चुकलेल्या पथिकां दिशा दावि जणुं ध्रुव
हृदयास दिलासा दे तव मृदु पदरव.

१९४२

## ७०. नेत्रचुंबन : : लीलारति

विस्मरूनि जाया " मी-तूं-पण- " जाणिव
विस्मरूनि जाया जगिंचे कटु अनुभव
सेवितें चिमकुल्या ! तव मधु अधरामृत
परि नेत्रिं तुझ्या मी मलाच जैं देखितें
स्मृति झांकाया ती नेत्रहि तव चुंबितें

१९४२

## ७१. निराशेस : : वागीश्वरी

निराशे ! तुझें शांत सौंदर्य शोभे
खुले फेन रंगीं तुला पातळ
मुखीं रम्य औदास्य नांदे सदाचें
कधीं भावनांचें उठे वादळ
शिरीं मुक्त केशांस सोडूनि देसी
जणूं पाश ओढावया अंतरें
खरी शोभसी प्रीतिची तूं सपत्नी
जिथें प्रीति जाशील तेथें त्वरें
मुळीं हौस नाही तुला भूषणांची
परी राज्यतृष्णा महा तापदा
सुराज्यासनीं प्रीतिच्या नित्य शोभूं
असे हीच कांक्षा तुझी सर्वदा
कधी ओढुनी प्रीति देवीस खालीं
मनोराज्य घेशील तूं निष्ठुरे !
जया आपुलें मानिसी तूं तयांचीं
क्षणी भग्न होतात गे अंतरें
परी सांग ना भग्न झाल्या मनांची
अवस्था कधीं का टिके कायम ?
विरागी बने का तुझा भक्त किंवा
जगीं मानितो सौख्य-दुःखा सम ?

तया चक्षु देतेस का तूं सहिष्णू
जगत्सौख्य देखावया देवते !
कधीं अश्रु येतात का नेत्र–शिंपांत
देखूनियां दु:ख जें भोंवतें ?
बघे आत्मकेंद्रा त्यजोनी तयाचा
मनोभाव विश्वांतरी बंधुता ?
असें दिव्य सामर्थ्य लाभेल कां गे
निराशे ! तुझी साधना साधितां ?
तरी तोडुनी बंधनें मानलेलीं
तशी भीति सोडूनियां सर्वही
अगे, ठेवुनी देह संसारपाशीं
तुझ्या दास्यि कंठीन मी जन्मही
निराशे ! परी बंद केलींस द्वारें—
—मनांचीं खुलें राहिलें एक जें
गवाक्षांतुनी त्याच काव्याचिया या
जगद्रूप देखावया मी सजें
मुदें सर्व रेखीन राहूनि अदृश्य
पाहीन जें रम्य या भूवरी
तयांच्या कथा गोड गाऊनियां नित्य
गुंगेन हर्षूनियां अंतरीं
जणूं दिव्य कैलास तो शैलगर्भी
तसे भाव वाणींत या कोरुनी
कलेनें मती गुंगवावी जगाची
अशी आस निर्मी कुणी मन्मनीं
तुझें दिव्य सामर्थ्य नाहीं परी हें
तुझी जी सपत्नी जगन्मोहिनी

जिनें स्थापिलें मानवा शाश्वताच्या—
—पदीं देउनी त्याग–संजीवनी
तिनें जीवनीं प्रेरिली विश्व–सेवा
तिनें निर्मिलीं काव्य–पुष्पें मनीं
जयांनीं तिला पूजितां शांति लाभे
कधीं जीवनाच्या सुवर्णक्षणीं
तरी एकल्या त्या क्षणीं जीवनाचा
हजारों कलांनीं फुले चंद्रमा
निराशे ! मनीं दिव्य आभास हो कीं—
" हंसे अक्षयीं प्रीतिची पौर्णिमा ! "

१९४२

## ७२. स्वतंत्रते ! : : नववधू

सर्वस्वहि लाविन आज पणा
आणीन तुला परि निज सदना
हीनदीनपण गतशतकाचें
सुखासीनपण देहमनाचें
फेकुनि दिधलें बघ कायमचें
जाहलों समुत्सुक आज रणा ॥ १ ॥

मातृभूमिची थोर तपस्या
तिची सांगता आज कराया
सिद्ध होति तत्पुत्र सुता या
दे स्वतंत्रते ! आशीर्वचनां ॥ २ ॥

पराक्रमा आव्हान करोनी
ऐक्याच्या मधु मंत्रोच्चरणीं
सर्वस्वाचें हवन करोनी
वाहिले प्राण हे तव चरणां ॥ ३ ॥

यज्ञज्वाला भिडतां गगनीं
प्रकटशील ना त्या ज्वालांतुनि
ध्यास हाच लागला या मनीं
ये स्वतंत्रते ! करि उद्धरणा ॥ ४ ॥

१९४२

## ७३. चल ऊठ प्रवासी ! – : : नववधू

चल ऊठ प्रवासी ! उचल पदा
येईल पुढें रजनी भयदा
एकलाच तूं तुला न सहचर
मार्ग तुझा विपिनांतुनि खडतर
फिरति श्वापदें हिंस्त्र भयंकर
करितील तुझी ना कीव कदा ।। १ ।।

जाइल यौवन झरझर झरुनी
सौंदर्याचें पुष्प गळोनी
सर्व शिदोरी जाइल सरुनी
ग्रासील पथीं चिंता विपदा ।। २ ।।

काळवंडल्या दिशा न अजुनी
तोंवरि चल मनिं धैर्य धरोनी
हृदयिं प्रभूचें नाम स्मरोनी
जाशील अंतिं निर्वाण–पदा ।। ३ ।।

१९४२

## ७४. रशियन सप्ताहानिमित्त : : लवंगलता

अज्ञानाचीं जिथें जळमटें होतीं बुजबुजलेलीं
वाऱ्याची ना झुळुकहि जेथें घाम पुसाया आली
भीक मागती कामकऱ्यांचीं जिथें लेकरें-बाळें
जिथें भुकेनें अन् रोगांनीं पसरियलें निज जाळें
स्त्री शय्येची विलासिनी अन् विनावेतनी दासी
जन्मठेपिचा कैदी ठरतो श्रेष्ठ जिथें तुलनेसी
नव लाखांचें रक्त शोषुनी नऊ मजा लुटितात
सौख्य--स्वर्गी एक बसे अन् लाख गळ्यांना तांत
त्याच बलींच्या जीवात्म्यांची एकवटोनी शक्ती
आज जन्मली करित गर्जना असुरमर्दिनी क्रांति
तिनें श्रमाला राज्य दिलें अन् समतेच्या करिं न्याय
वामन झाला विजयी देउनि बळिच्या मस्तकिं पाय
कामकऱ्यांनीं संघबलानें करुनी आत्मोद्धार
तुरुंग फोडुनि सुखशांतीचें मुक्त टाकिलें द्वार
त्या नर्काची स्मृतिही जावी कायमचीच पुसोनी
म्हणुनि टाकिले दुर्भागी ते गोठे ध्वस्त करोनी
रहिवासी तेथील अभागी !—छे ! आतां ते राजे
कामकऱ्यांच्या नवराज्याचा जगीं चौघडा वाजे

× × ×

ये दिव्यत्वा ! कशास आतां रेंगाळसि आकाशीं ?
भूमीवरती राज्य श्रमाचें ये त्याच्या करपाशीं—

धनवंताचें भुवन उजळणें पुरे अतां रविराया !
झोपडींतल्या श्रमराजाचा येई तिमिर हराया
वसुधे ! माते ! सहस्रधारा वात्सल्याच्या सोड
नांगरधारी भूबालाकरिं दे शास्त्याचा दंड
ये विज्ञाना ! छत्रचामरें घेउनियां निज हातीं
गर्वोद्धत शिर नमव आमुच्या भू--पतिचरणांवरती
ललितकलांनो ! श्रीमंतांची नाटकशाळा व्हाया
तुम्हां शापिले कुणीं पसरुनी अमंगलाची छाया ?
समतादेवी मांगल्याचे सुधा--कुंभ घेवोनी
पावन करण्या सज्ज जाहली या स्व--शिरें लववोनी
दिगंगनांनों ! स्तिमित होउनी काय पाहतां वरतीं ?
रक्तध्वज हा श्रमराजाचा--मानवतेची दीप्ती
याच ध्वजाच्या छायेखालीं विसरुनि अपुलें वैर
समतेच्या मंचकीं पहुडतिल राष्ट्रपुरुष निर्घोर
शस्त्रास्त्रांचें भूत भयंकर स्वप्नीं ना भिववील
बुभुक्षितांच्या किंकाळ्या नच झोपमोड करतील
" बंधू आम्ही सर्व—आमुचें विश्व--कुटुंब विशाल "
तृप्त मनांचे सप्त सूर हे शांतिगीत गातील
त्या शांतीनें भरुनी जातां विश्वगोल हा सारा
आश्चर्यानें निष्प्रभ होतिल आकाशींच्या तारा !

१९४२

## ७५. जग निराळेंच मम तुझ्याहुनि : : नववधू

जग निराळेंच मम तुझ्याहुनी
मी कशास येऊं तव सदनीं ?
दृष्टि तुझी ही नित आकाशीं
चंद्र, तारका, रवि--सहवासीं
मला झगडणें नित्य तमासीं
पथ माझा काव्याकुड्यांतुनी ।। १ ।।

झगमगाट करि विद्युद्दीपक
सूर छेडि मधु स्वर--संवाहक
षड्रस अन्नें, वसनें मोहक
तुजभंवति उभें जग कर जुळुनी ।। २ ।।

झोपडींत मिणमिणते पणती
भूक, दुःख कारुण्यें गाती
अर्धनग्न ते मम सांगाती
मी दासि तयांची दिन--रजनी ।। ३ ।।

दोन ध्रुवांचें व्हाया मीलन
जन--सेवेमधिं तनमन झिजविन
येतां कधिं तो शुभमंगल दिन
होईन धन्य तव करग्रहणीं ।। ४ ।।

१९४२

## ७६. तुझें दर्शन ! : : लीलारति

हळु हळू सरकतो जीवन–पडदा वरी
हा काळ टाकितो तेज–झोत तुजवरी
चमकसी सख्या ! जणुं अमितपैलुमय हिरा
नव पैलु दावि नित किरण--परावर्तन
अन् घडे मज तुझें नित्य नवें दर्शन !

१९४२

## ७७. बापाचें स्वप्न : : लीलारति

देखिलीं शैशवी स्वप्नें किति मोहक
प्रल्हाद क्षणीं तर क्षणिं मी ध्रुवबालक
 परि यौवन येई हांसत अवखळपणें !
झाकिलीं तयें तीं स्वप्नें एका करें
उघडिलीं दुज्यानें शौर्याचीं मंदिरें

× × ×

निज सामर्थ्याची जाणिव मनिं दाटली
हो प्रबल भावना, नयनें धुंदावलीं
 स्वातंत्र्य--संगरीं शिव होइन वाटलें !
परि सत्य--दर्शनीं हय माझा उधळला
शरविद्ध देह हा जीवनरणिं पहुडला

× × ×

अस्पष्ट जाहलीं स्वप्नें आतां मम
हीं गात्रें शिणलीं दाटे भवतीं तम
 परि अजुनी हृदयीं ज्योत मंद तेवते
त्या किरणीं दिसते बालमूर्त गोजिरी
पुनरपी जीवनीं ये अनुपम माधुरी

× × ×

अन् एकच आतां स्वप्न तरळतें मनीं
तें तरी अवतरो प्रभो ! सत्य—जीवनीं
 अतृप्त माझिया आकांक्षांचा निधी
हा पुत्र लाडका हो देशोद्धारक
विलसुं दे जगीं जणुं तेजें ध्रुवतारक !

१९४२

## ७८. स्वागत : : कोकिला

अमूर्त कोणी हृदयीं माझ्या गाइ सुमंगल गान्
अपूर्व हुरहुर वाटे कसली
नव भावोर्मी हृदयिं उसळली
तनु भीतीनें कांपे तरि ये आनंदास उधाण ॥ १ ॥
सख्या टोचिती विनोदवचनें
अश्रूंनी हीं भरति लोचनें
परि एकांतीं जागृति--स्वप्नी रमतें हरपुनि भान् ॥२॥
प्रियतम–प्रतिमा करीं घेउनी
पाहत बसतें निरखुनि, रोखुनि
साक्ष मनोमन् पटतां नयनीं दाटे मनिं अभिमान् ॥३॥
येइल घेउनि रूप कुणाचें ?
जगमोहन का वनमालीचें ?
किंवा चमकत येइल चपला नवतेजाची खाण ॥ ४ ॥
येइल का प्रभु–दूत होउनी
समतेचा संदेश घेउनी
शिकविल का विश्वास शांतिचा मंगल मंत्र महान्॥५॥
कुणाचेंहि ये रूप घेउनी
सुस्वागत तव करिते जननी
जादुगार रे तूं अज्ञाता ! तूं मम सौख्य-निधान् !॥६॥

१९४२

करिताती युद्ध । लक्षावधी शोध
हृदयाचा वेध । साधूनीयां
हादरते श्रद्धा । बावरतें मन
भावना उद्यान । करपतें
प्रीति, शांति, शक्ति । दयेच्या देवता
वरिती उग्रता । चंडिकेची
सत्य-अहिंसेचीं । शस्त्रें करूनियां
दुबळ्या हृदया । छेदिताती
ठोकूनी शृंखला । लोक-सत्ता पायीं
शांततेची द्वाही । फिरविती
श्रद्धेचा देव्हारा । रिकामा करोनी
देवता उठोनी । गेली कुठें ?
यंत्र राक्षसाचें । करूनी वाहन
पृथ्वी--आक्रमण । मांडियेलें
दीन--दुर्बलांचें । आर्त आक्रंदन
वाटतें स्तवन । देवीलागीं !
देवीच्या वरानें । मातले मानव
जाहले दानव । आत्मनाशी

करोत प्रलय । शस्त्रें, शास्त्रें सर्व
वाढवोत गर्व । मानवाचा
पर्णी समतेच्या । अखेरीस परी
प्रेमरूप हरी । अवतरेल

१९४२

## ८० नव्या युगाची युगंधरा : : पादाकुलक

युगंधरा मी नव्या युगाची
मानवतेचा ध्वज करिं धरुनी
उंच स्वरानें स्वतंत्रतेचीं
गाइन उज्ज्वल मंगल गाणीं

हवें मला प्रिय गृहमंदिर मम
नको परी ती बंदीशाला
प्रेमळ पति मम देव खरोखर
नव्हे परी तो राखणवाला

बाळें चिमणीं गृहरत्नें मम
परि न शृंखला त्या पायींच्या
विकास त्यांचा, विकास माझा
विकास यांतचि मम राष्ट्राचा

विश्वाच्या सुख-संसारास्तव
समानतेचीं गाइन गाणीं
चीड असे मज अन्यायाची
गुलामगिरिची, दुर्बलतेची

स्वतंत्र, सबला, राष्ट्रशक्ति मी
पर्वा मुळिं नच मज कष्टांची
अर्धी मानवता मी, मजला
पाहिन दास्यीं ठेविल कोण ?

आणि जगावर मग शांतीचा
रत्न मुकुटही चढविल कोण !
शांति, शक्ति अन् प्रीतिरूप मी
करांत माझ्या गुंफोनी कर
पौरुष, विक्रम शास्त्र शस्त्र हे
चालतील जर या विश्वावर
तर या विश्वाचाही हेवा
करतिल सगळे देवहि स्वमनीं
युगंधरा मी नव्या युगाची ।
मानवतेचीं गाइन गाणीं

१९४४

## ८१. प्रीतिपथावर— : : देवद्वार

प्रीतिपथावरी । चालतां चालता
विश्वाची भव्यता । नेत्रीं भरे.
विश्वाच्या हृदयीं । प्रीतिपथ दिसे
आणि जीव हांसे । आनंदानें.
जीविताचें मज । विश्वरूप दिसे
जेव्हां चालतसे । प्रीतिपथीं.
प्रीतिपथावरी । छाया—प्रकाशाची
क्रीडा जीविताची । कमनीय.
प्रीतिपथावरी । अरुणाची प्रभा
आणि संध्या—शोभा । एकवटे
खाच खळग्यांनीं । भरे सारा पथ
स्नेहाचें अमृत । ठायीं ठायीं.
प्रीतिपथावरी । भेटले दुर्जन
भेटले सज्जन । सहृदय
मायेच्या मेघांनीं । केली बरसात
माझा प्रीतिपथ । फुलविला.
वादळही कधीं । मनःक्षोभकारी
प्रीतिपथावरी । नाचलें या.
प्रीतिपथावरी । माधुर्य दुःखाला
उधाण सौख्याला । येई नित्य

स्वानुभवांचीच । घेतली शिदोरी
तृषा क्षुधा सारी । शमवील
प्रीतिपथींचिया । माझ्या सोबत्यांनो !
शत्रूंनो ! मित्रांनो ! । नमस्कार !
ऋणभार शिरीं । तुम्हां दोघांचाहि
कैसी उतराई । होऊं तरी
प्रवासांत साद । मधुनीयां घाला
जीवन यात्रेला । निघालें मी

१९४४

# कवितांच्या प्रथम चरणांची सूचि

( शीर्षकांपुढील आंकडे पृष्ठें दर्शवितात )


अ

अजुनि कशा नयनींची नीज न तव सरलि गडे ... ७४

अमूर्त कोणी हृदयीं माझ्या गाइ सुमंगल गान् ... ९८

अशी व्हावी रे वहिनी। स्फूर्ति तुझ्या हृदयाची ... ८०

अज्ञानाचीं जिथें जळमटें होतीं बुजबुजलेलीं ... ... ९३

आ

आलों समोरासमोर ... ... ... ७५

आयुष्याच्या रम्य प्रभातीं... ... ... ६७

उ

उद्यान रम्य जर चोंहिकडे ... ... १७

उभी मी कधिंची। कधिंची तव दारीं ... ... ४०

ऐ

ऐके दुदुंभि वाजताति, सखये, दे हांक मातें कुणी ... १९

अं

अंत लागेल का त्वन्मनाचा मला? ... ... ३६

क

कधीं ना येइल खग हा करीं ... ... ४५

कधीं मज वाटे। दुःखाच्या लहरी ... ... ६९

कमलाचें पान जलांत जन्मतें ... ... ३

करितात युद्ध। लक्षावधी शोध ... ... ९९

कशाची भाउबीज आज। दश दिशा धुंद पहा झाल्या ... १३

कशास सोडिशी। सांग पुष्प बाण ... ... १०

कळुनि मम भावना सांग येशील ना ? ... ... ४१
काळ जाई दूर दूर । स्मृति-रत्नांना चोरून ... ... ६४
कुठें रे प्रपाता ! असा धावतोसी ... ... ५७
कुणि गोंजारुनिया घालि स्वर्ण भूषणें ... ... ८२
कुणी कुणास्तव कधीं गुंफितें अश्रुमाळ लोचनीं ... ५१
कोठें तरी पल्वलांत । कमलिनी जन्म घेई ... ... ५०
क्रांति-उषा उजळे युवका । कर पुरे ! प्रणयकूजन ... ७७

ख

खवळला सागर बघ हा किती ... ... ४

च

चल ऊठ प्रवासी ! उचल पदा ... ... ९२

ज

जग निराळेंच मम तुझ्याहुनी ... ... ९५
जेधवां ही पावसाळी ये हवा ... ... ७९

त

तारुण्याचा वसंत्र उमले कोकिल गाई मधुर ... ... १२
तूंच मला शिकविलेंस प्रेम कराया ... ... १
तृणमय शय्या पर्णकुटीमधिं नील टेकडीखालीं ... २९
त्यजुनि केवळ वदनींचा ऊठ समरिं जाया ... ... ८४

द

दया-धर्मा तुज । पाहायच्या नेमा ... ... ३०
देखिलीं शैशवीं स्वप्नें किति मोहक ... ... ९७

ध

धरुनि वदनकमल करीं बाळ ! मजसि निरखुं दे. ... ७२
धवल कौमुदी ही । पाझरे नभातुनीं खालीं ... ... ३८

न

नका पाजूं मज स्तुतीची मदिरा ... ... २
नको अशी हांक मारूं ... ... ... २२
नको सख्या ! जाऊं तेथें ... ... ... १६

| | | |
|---|---|---|
| नितांत शांत चांदरात पसरली जगावरी | ... | ... २५ |
| निराशे तुझें शांत सौंदर्य शोभे | ... | ... ८८ |
| नेत्रीं आसु कशास हे प्रियसखे ? | ... | ... ७० |

प

| | | |
|---|---|---|
| परक्याची पाऊलवाट ही मान्य नसे मज मुळीं | | ... ७३ |
| पवन वाजवितो मधु बांसरी | ... | ... ६ |
| पाहूं कुठें तुला । विचारितां ऐसे | ... | ... २४ |
| पूर्वेच्या नवमंडपीं मधुरशी शोभा गुलाबी खुले | | ... ३१ |
| प्रीतिपथावरी । चालतां चालतां | ... | ... १०३ |

फ

| | | |
|---|---|---|
| फुलवित भव्य जगन्मुकुलाला | ... | ... ३७ |

ब

| | | |
|---|---|---|
| बाळ हांसलें । ग । तेज फांकलें | ... | ... ७८ |
| बेसुर झाली वीणा आतां कसलें मंजुळ गान... | | ... ९ |

म

| | | |
|---|---|---|
| मधुकरा, सोड ना हा रुसवा | ... | ... २७ |
| मधुर मधुर स्मृति फुलल्या हृदयीं | ... | ... ८५ |
| मी तुझीच ना रे कां मग बघसी असा ? | ... | ... ५६ |
| मृत आशाचें रान निकस तें हृदयीं मी जाळिलें | | ... १५ |

य

| | | |
|---|---|---|
| या जाईच्या रम्य मांडवाखालीं | ... | ... ४७ |
| या वर्षाकालीं ताम्रवसन लेवुनी | ... | ... ८३ |
| ये, इंदु ! येई आकाशीं ... | ... | ... ११ |
| येतां वसंत नटवीत मुदें जगाला | ... | ... ६० |
| युगंधरा मी नव्या युगाची ... | ... | ... १०१ |
| यौवन उद्यानांत नाचलें कारंजें सौख्याशेचें ... | | ... २३ |

र

| | | |
|---|---|---|
| रजनि धवल गुंफितसे हार कौमुदीचा | ... | ... २८ |

राज्य तुझें जगावरी ... ... ... ४२
रात्र टाकिते कशास उघडी दौलत अपुली आकाशीं ... ६१

ळ

लाल गुलाब खुडुनी दिधलास माझ्या हातीं ... ६३

व

वदतात लोक सारे। न पटे तुझें नि माझें ... ... ७९
वर्षा वर्षतो ग दारीं ... ... ... ५
वाहतो भरारा वारा पानांतुनीं ... ... ३३
विफल कशा आकांक्षा जाहल्या कळेना ? ... ... ३२
विश्रांतीची वेळ जाहली नीज नीज, बाले! आतां ... ८
विस्मरूनि जाया मी-तूं पण जाणिव ... ... ८७
व्यर्थ कां उधळिसी स्मित-सुमें मजवरी ? ... ... ५४

श

शांतता नको कधींच जीवनांत माझिया ... ... ४४
शुभमंगलमय समय तुझ्या हा जीवितांतला राया! ... ४९
शून्यांत अंबरीं शून्य नजर खिळवुनी ... ... ८६
शैलराज हृदयांत ... ... ... २०

स

सखे! नाहीं भग्न झालें ... ... ... ३५
सखये! चल रंगवुं ये चित्र जीवनाचें ... ... ५२
सर्वस्वहि लाविन आज पणा ... ... ९१
सुखदुःखाच्या आठवणींनीं चित्रित झालें मन... ... ६५
सुखाच्या उद्यानीं। हातामध्यें हात ... ... ५९

ह

हळु हळू सरकतो जीवनपडदा वरी ... ... ९६
हासऱ्या भावना दाबुनी अंतरीं ... ... २६
हृदयाचें सिंहासन ... ... ... ३४